


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








## *अनुक्रमणिका*

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष २१ वें ] जानेवारी-मार्च १९४९ [ अंक ४ था


## लक्तरें जपणाऱ्या आजोबांस—

[ गज्जलवृत्त – देवप्रिया ]

रक्षितां वाया शिणोनी लक्तरें कां हीं उगा ?
मोल वस्त्रांचें न त्यां ये राखुनी त्यांची निगा !
एक काळीं शोभलेलीं आपुलीं दिव्यांवरें
आजला तीं जीर्ण झालीं लागलीं फाटूं त्वरें
आपल्याला वाटतो हा फार मोलाचा निधीं
लाज चिंध्यांनीं कुणाची राखिली सांगा कधीं ?
आपुलीं वाळें भिडेनें मान यांचा ठेवितीं
वाटतें राहील यांची कां उद्यांला ही स्थिती ?
नातवंडें पंतवंडें थोर होतीं जेधवा ?
व्हावयाचा तोंवरी ना वेश त्यांचा का नवा ?
होउनी विच्छिन्न गेलीं रंगही गेला तसा
ढंगही भावी पिढीला मान्य व्हावा हा कसा ?
ठेवितां पेटी भरोनी लाउनी टाळें वडें
केर फेकाया उद्यां तो आजचे छावे खडे
आपुल्या हातें त्वरेनें पोत त्यांचा पेटवा
मानवाच्या देवतेला नम्रतेनें शांतवा
गोष्ट जी गेली ठरोनी व्हायची केव्हा तरी
ती करोनी व्हा यशाचे आजला वाटेकरी

—( सौ. ) शांता शर्मा


अनुक्रमणिका

# कालिदासाची वनश्री :

ले०— डॉ. म. वि. आपटे,
बी. एस्सी.; एम्. बी. बी. एस्.
कैवल्यधाम, लोणावळे.

कालिदासाचीं लघुकाव्यें आणि नाटकें यांतील वनश्री पाहिली. तदनुषंगानें महाकाव्यांतील कांहीं भाग पाहिला. आता रघुवंश काव्यांतील वनश्री पाहूं या. रघुवंशी राजे अयोध्या प्रदेशांतले. म्हणून तेथील वनोपवनांची वर्णनें पुनः पुनः येतात. भागीरथी, तमसा, सरयू, या नद्यांचे उल्लेख त्यांत आहेत. तेथील तपोवनें हिमालयाच्या पायथ्यावरचीं. त्यांचा उल्लेख वरचेवर येतो. या वर्णनांत नवीन उद्भिदांचा उल्लेख क्वचितच येतो. कारण उघडच आहे की, याहि प्रदेशाचा परामर्श लघुकाव्यांत घेतलेला आहे. हें दाखविण्यासाठीच पूर्वी लघुकाव्यांतील उताऱ्यांच्या जोडीने महाकाव्यांतील उतारे दिलेले आहेत.

प्रस्तुत काव्याच्या चवथ्या सर्गांत वनोल्लेख विपुल आणि विविधहि आहेत. यांत रघुदिग्विजय वर्णिला आहे. रघुराजा प्रथम गंगातीराने गंगामुखापर्यंत गेला. मग दक्षिणेस वळून मलयस्थलीपर्यंत गेला. नंतर मलय आणि दर्दुर ( नीलगिरि ) यांच्यामधील खिंडीतून पश्चिमेस सह्याद्रि ओलांडून अपरांतांत उतरला. तेथून स्थलमार्गानेच पलीकडे पारसीकांत गेला. मग उत्तरेस वळून काश्मीरांत आणि तेथून हिमालयावर गेला. हिमालयावरून तो प्राग्ज्योतिषांत ( आसामांत ) उतरला. प्रवासाचा पल्ला लक्षांत घेतां कवीने केलेलें वर्णन अगदींच संक्षिप्त वाटतें. त्यांतील वृक्षादींचे उल्लेख एकेका प्रदेशांतील एकादा असेच आहेत. तथापि ते तसे निवडक असल्यानेच महत्त्वाचे आहेत.

रघुपुत्र अज याचा विवाह विदर्भांत झाला. तेव्हा त्या मार्गांतील वनश्री कवीने उल्लेखिली: स्वयंवरप्रसंगीं इतर देशांतील राजांचीं वर्णनें आलीं त्यांत त्या त्या देशांतील वनविशेष सांगितले. सीतेच्या शोधार्थ राम लंकेस गेले आणि तेथे तिची सोडवणूक करून विमानाने परत आले. हा प्रसंग तर कवीला भारतांतील प्रदेशवर्णनास विशेष सोईचा वाटला. कवीने स्वतः विमानांतून प्रवास केलेला नव्हता. तथापि काव्यदृष्टीने त्याने तो प्रवास किती मार्मिकपणें वर्णिला आहे तें पहाण्याजोगें आहे. दक्षिण आणि मध्यभारत यांतील वनांचीं वर्णनें यांत आहेत. अशी हीं भौगोलिक आणि ऐतिहासिक अनुसंधानें राखून वाचकांनी ४, ६, १३ या सर्गांचें मनन करावें. म्हणजे प्रस्तुत महाकाव्यांतील वनश्रीवर्णनाचें महत्त्व लक्षांत येईल. आता या सर्व उल्लेखांचा क्रमशः परामर्श घेऊं.

शमीमिवाभ्यंतरलीनपावकां नृपः ससत्त्वां महिषीममन्यत । र.३.९.

शमीच्या पोटांत अग्नि असतो त्याप्रमाणें राणीच्या पोटांत गर्भ राहिलेला आहे असें दिलीप राजाला समजलें.

शमी हा रुक्ष प्रदेशांत वाढणारा वनवृक्ष आहे. त्याच्या लाकडाचा उपयोग घर्षणाने अग्नि उत्पन्न करण्याकरता प्राचीन काळीं करीत. यज्ञाकरतां अग्नि उत्पन्न करावयाचा तो शमी आणि पिंपळ यांच्या लाकडांच्या घर्षणाने करीत. त्यावरून शमीच्या अंगीं अग्नि लपलेला असतो अशी भाषा रूढ झाली. सर्व इंधनामध्ये उष्णता गुप्त असते, असें आज शास्त्रीयदृष्ट्याहि म्हणतात. या उष्णतेचें आज मापनहि करता येतें हा विशेष आहे. शमी-

नंतर खदिर आणि त्यानंतर बाभूळ प्रचारांत आली. बाभळीचा मूळदेश अरबस्थान. खदिर आणि शमी मात्र भारतीय आहेत. औद्भिदशास्त्रदृष्ट्या तींहींचा गण एकच आहे.

[ शमी १ ]

तांबूलीनां दलैस्तत्र रचिता पानभूमयः । ( तत्र इति कलिंगेषु )
नारिकेलासवं योधाः शात्रवं च पपुर्यशः ॥ र० ४.४२.

गोदावरीच्या उत्तरतीरावर कलिंग देशांत पानभूमीमध्ये नागवेलीची पानें मांडलेली होती. योद्धे मंडळींनी तेथील माडांचें आसव आणि त्यासह शत्रूचें यशहि पिऊन टाकलें. !

तांबूली म्हणजे विड्याच्या पानांची वेली. ही वेली नागाप्रमाणें डावी-उजवीकडे झुकत झुकत झाडावर चढते म्हणून तिला नागवेली म्हणतात. प्रत्येक पेरावर तिला बारीक बारीक मुळ्या फुटतात. त्यांच्या योगाने ती आधारझाडाला पकडून राहते.

[ तांबूली २ नारिकेल ३ ]

ततो वेलातटेनेव फलवत्पूगमालिना ।
अगस्त्याचरितामाशां अनाशास्यजयो ययौ ॥ ४४ ॥

तेथून समुद्रतीरानेच रघुराजा चालूं लागला. त्या तीरावर पोफळीची झाडें रांगेने लावलेलीं होतीं. तीं फळांनी भरलेली होतीं. राजाचा जय झाला हें वेगळें सांगणें नकोच.

[ पूग ४ ]

बलैरध्युषितास्तस्य विजिगीषोर्गताध्वनः ।
मारीचोद्भ्रान्तहारीताः मलयाद्रेरुपत्यकाः ॥ र० ४.४६

कांही मार्ग चालून जाऊन रघूच्या सैन्यांनी मलयपर्वताच्या तळपठारावर वसति केली. तेथे मिऱ्यांच्या उग्र वासाने हारीत पक्ष्यांची मोठी धांदल उडाली. ( हारीत हे सैन्यासह नेलेले कबूतर असावेत ) मिऱ्यांचे वेल असतात. त्यांची चढण्याची पद्धति तांबूलीसारखीच असते. मिरे हीं फळें होत. मिरवेलींत नर आणि मादी असे वेगवेगळे वेल असतात. कच्चे मिरे काळे असतात, पक्के पांढरे असतात. तांबूली आणि मरीच यांचें गोत्र आणि अर्थात् गणहि एकच आहे. [ मारीच ५ ]

ससंजुरश्वक्षुण्णानामेलानामुत्पतिष्णवः ।
तुल्यगंधिषु मत्तेभकटेषु फलरेणवः ॥ र. ४.४७

घोडयांच्या टापांनी वेलदोडे तुडवले गेले. त्यांच्या फळांची धूळ उडून हत्तींच्या गंडस्थलांतून वहाणाऱ्या मदधारांत चिकटून बसली. एलाफल आणि हत्तींचा मद दोनहि सुगंधीच !

वेलदोडयाचीं झाडें आल्याच्या झाडासारखीं पण मोठी असतात. त्यांची पानें कंबरे-इतकीं उंच जातात. त्यांची खोडें भुईसरपट असतात. त्यांतून फुलांचे दांडे निघतात. ते मात्र लांब लांब असून त्यांचे शेंडे डोकें वर काढतात. पुढे तेहि भुईवरच लोळतात. अर्थात् फळें जमिनीलगत राहतात. झाडाचा आधार मिळाल्यास फुलांचे दांडे त्यांना टेकून राहतात.

[ एला ६ ]

भोगिवेष्टनमार्गेषु चंदनानां समर्पितम् ।
नात्रसत् करिणां ग्रैवं त्रीपदीच्छेदिनामपि ॥ र. ४.४८.

सर्पांनीं गजबजलेल्या मार्गात चंदनाच्या झाडांस हत्तींच्या गळ्यांतल्या साखळ्या आडकविल्या होत्या. पायबंद तोडणारे हत्ती खरे, पण तेहि या साखळ्या तोडूं शकले नाहीत. झाडें इतकीं बळकट होतीं.

ज्याचें किंचित् पिवळें लाकूड उगाळून गंध करण्याची पद्धत आहे तो वृक्ष चंदन होय. याचीं पानें साधीं आणि समोरासमोर जोडी जोडीनें असून त्यांच्या बगलेंत फुलांचें तुरे येतात. फुलें बारीक आणि आरंभीं पिवळस असून नंतर तीं गुलाबी होतात. रक्तचंदनाहून हें झाड अगदीं निराळें असल्यामुळे त्यास सितचंदन असें म्हणतात. स्तनेषु हाराः सितचंदनार्द्राः । ऋ. ६.६. [ सित चंदन ७ ]

अभ्यभूयत वाहाना चरतां गात्रशिंजितैः ।
वर्मभिः पवनोध्दूत-राजतालीवनध्वनिः ॥ र. ४.५६.

घोडे चालत असतांना त्यांच्या अंगावरील कवचांचा जो ध्वनि चाले त्यानें राजतालीवनांत वाऱ्यानें उसळणाऱ्या ध्वनीच्यावर ताण केली. ( हें वर्णन अपरान्ताचें म्ह. पश्चिम समुद्रतीराचें आहे. )

राजताली कोणत्या असाव्या हें नेमकें सांगता येत नाहीं. तालाच्या गणांतील ताल-ताली, खर्जूर -खर्जूरा, नारिकेल आणि पूग इतक्या जातींचा उल्लेख या सर्गांत आहे. या शिवाय वेतसांचाहि समावेश तालगणांत होतो. राजताली याचा अर्थ भव्य आणि सुंदर ताली असा केला तर हें अभिधान पूगास शोभण्यासारखें आहे. नारिकेल त्याहून दांडगा असतो, पण सुंदर नसतो.

खर्जूरीस्कंधनद्धानां मदोद्गारसुगंधिषु ।
कटेषु करिणां पेतुः पुन्नागेभ्यः शिलीमुखा ॥ र. ४.५७.

खजुरीच्या झाडाला बांधलेल्या हत्तींच्या गंडस्थलांतून मद निघत होता. त्यांच्या सुगंधानें मोहित होऊन पुन्नागावरील भुंगे त्यावर तुटून पडले.

पुन्नागाला उंडी म्हणतात. याचीं पानें साधीं समोरासमोर चकचकीत अशीं असतात. पानाच्या बगलेंत फुलांच्या लोंबत्या मंजिरा येतात. फुलें नर, मादी अशीं एकलिंगी आणि उभयलिंगीं तीनहि प्रकारचीं एकाच झाडावर येतात.

हें वर्णन कोकणाचें आहे असा समज आहे. कोकणांत उंडीचीं झाडें आहेत. पण खजुरीचीं नाहीत. शिंदीचीं आहेत. शिंदी आणि खजुरी यांचा निकट संबंध आहे. शिंदी वन्य आहे, खजुरी उपवन्य म्हणजे लागवडीनें तयार केलेली आहे. शिंदीच्या एकाच झाडावर केसरफुलें आणि किंजफुलें म्हणजे नरफुलें आणि मादीफुलें वेगवेगळीं असतात. खजुरामध्ये मात्र तीं वेगवेगळ्या झाडावर येतात. खर्जूर, खर्जूरा आणि खर्जूरी असे तीनहि शब्द रूढ आहेत. त्यापैकीं खर्जूरा हा शब्द येथें वापरलेला आहे. शाकुंतलांत पिंडखर्जूर असा शब्द वापरल्याचें सांगितलेंच आहे. उत्तर भारतांत शिंदीच्या फळांना खजूर म्हणतात. त्यावरून पिंडखर्जूर म्हणजे शिंदीफलच असेल असें मानून, मागील लेखांत त्या अर्थाचा पारिभाषिक जातिवाचक शब्द म्हणून कोष्टकांत दिला आहे.

प्रस्तुत श्लोकांतील वर्णन सिंधांतील असण्याचाहि संभव आहे. सिंधांत खजुरी आहेत, आधुनिकांच्या मतें खजूरीचे मूळदेश सिंध किंवा त्याच्या पश्चिमेचे यावनी देश हेच होत. रघुवंश ४,५८ आणि ४,५९ मध्ये अपरान्त आणि त्रिकूट यांचा उल्लेख आहे. यापैकीं अपरान्त म्हणजे कोकण आणि त्रिकूट हें एक सह्याद्रीचे शिखर असें मानून तत्पूर्वींचा खर्जूरांचा उल्लेख शिंदीचाच आहे असें म्हणतात. परंतु अपरान्त याचा अर्थ पश्चिमप्रांत असा व्यापक घेतला तर त्यांत सिंधाचा समावेश होतो. त्रिकूट हें सिंधातलेंहि एकादें उंचवट्याचें स्थान असण्याचा संभव आहे. परंपरेनें त्रिकूट असें नांव कोणत्याच डोंगराला राहिलेलें नाही. ४,६०

मध्ये पारसीकांचा उल्लेख आहे त्यावरून त्रिकूट कोकणापेक्षां पारसीकाच्या अधिक निकट असण्याचा संभव आहे. तें कांही असले तरी सिंधांत खजुरी आहेत आणि होत्या, हें निश्चित आहे. पारसीकांत जाण्यापूर्वी जर रघूला कोठे खजुरी आढळल्या असतील तर त्या सिंधांतच असणार. रघूने पारसीकांत जाण्याला स्थलमार्गच पतकरला असें कवीने मुद्दाम सांगितलें आहे. तेव्हां सिंध वाटेंत येतोच. सगळया अपरांताचा मिळून एकच जयस्तंभ केला असेंहि मानतां येईल. [ खजूरा ८ पुन्नाग ९ ]

त्रिकूटमेव तत्रोच्चैर्जयस्तंभं चकार सः । रघु. ४,५९
विनयन्ते स्म तद्योधाः मधुभिर्विजयश्रमम् ।
आस्तीर्णाजिनरत्नासु द्राक्षावलय भूमिषु । रघु. ४.६५

रघूच्या सैनिकांनीं मद्य पिऊन श्रमपरिहार केला. तेथे द्राक्षावेली, हरिणचर्माची अंथरुणें, आणि रत्नें, यांनी भूमि सजलेली होती.

गोड फळे देणारी द्राक्षावेली प्रसिद्ध आहे. रघुवंशात पारसीकभूमीचा विशेष म्हणून तिचा उल्लेख आहे. द्राक्षांचें संवर्धन प्रथम पारसीकांनी केलें असें दिसतें. द्राक्षांचा मुख्य उपयोग मद्यसाहित्य असाच होता आणि आहेही. वन्यद्राक्षा भारतांत आहेत.

[ द्राक्षा १० ]

विनीताध्वश्रमास्तस्य सिंधुतीरविचेष्टनैः ।
दुधुवुर्वाजिनः स्कंधान् लग्नकुंकुमकेसरान् ॥ रघु. ४.६७

रघूचे घोडे सिंधुतीरावर हिंडून विसावले असतां त्यांनीं आपलीं आयाळें झाडण्याकरता खांदे हालविले, कारण त्यांत केशर अडकलें होतें. केशराचें संस्कृत नांव कुंकुम असें आहे. याचाच तिलक कपाळीं लावण्याची चाल होती. केशराचें पीक भारतामध्यें सिंधुतीराखेरीज इतरत्र होत नाहीं. इतर ठिकाणचे लोक अर्थातच त्याच्या ऐवजी हळदीपासून केलेले कुंकू वापरूं लागले. कुंकुमाला केशर हें नांव मिळण्याचें कारण असें. निशिगंधासारखे कुंकुमाचे कांदे असतात. त्यांना वरती पाती येतात आणि एक दांडा येऊन त्यावर फुलें येतात. त्या फुलांत मध्यवर्ती केसासारखे अवयव असतात. ते केशर होय. केसासारखे अवयव ते केसर अशी भाषा रूढ आहे. अशा अवयवांतहि दोन महत्त्वाचे भेद आहेत. ते असे. मध्यवर्ती अवयव असतात त्यावर परागांची उत्पत्ति होत नाहीं. परंतु त्यांच्या तळांत बीजक असतें; त्यांत पुढें दुसऱ्या अवयवांतील पराग मिळाल्यानंतर बी उत्पन्न होतें. पराग स्वीकारण्याकरता या मध्यवर्ती अवयवाच्या अग्रावर विशेष व्यवस्था असते. पराग उत्पन्न करणारे अवयव निराळे आणि बीजक उत्पन्न करणारे अवयव निराळे. दोनहि केसासारखेच दिसतात पण बीजकोत्पादक मध्यवर्ती, आणि परागोत्पादक त्याभोवती, अशी रचना असते. बारकाईने पाहता बीजकोत्पादक अवयव आरंभीं थोडे तरी जाड असल्याचें आढळतें. परंतु या गोष्टी लक्ष्यांत न घेता सर्वांसच सरसकट केसर म्हणण्याची वहिवाट आहे. त्यांतील भेद जाणणारे लेखक पुंकेसर स्त्रीकेसर अशी भाषा अलीकडे वापरतात. परंतु कालिदास–वाङ्मयांत एक सोय आढळते. ती अशी की, स्त्रीकेसरास किंजल्क म्हणावयाचें. केशर हें खरोखर केसर नसून किंजल्क असतें. त्यांत केसर असणें ही भेसळ होय.

कालिदासवाङ्मयांत किंजल्क हा शब्द एकदाच वापरलेला आढळतो. तो शंबूकवधासंबंधांत.

स तद्वक्त्रं हिमक्लिष्टकिंजल्कमिव पंकजम् ।
ज्योतिष्कणायतश्मश्रु कंठनालादपातयत् ॥ रघु. १५.५२ ॥

आकाशीय अग्निकणांनी त्याच्या तोंडावरील केस करपून गेलेले होते. हिमाच्या योगाने कमळातील किंजल्क नाश पावतें तसें त्याचे शिर रामानें कंठनालापासून वेगळें केलें. कालिदासानें उल्लेखिलेल्या फुलांत कमळ हें एकच फूल असें आहे कीं ज्यांतील किंजल्क ठळक असतात. इतर फुलांत ते लहान असून अल्पसंख्य असल्यामुळे नीटसे दिसून येत नाहीत. म्हणून इतरत्र त्यांचा उल्लेख आढळत नाही. इतरत्र केसरांचे उल्लेख आढळतात. केसर हे पराग उत्पन्न करणारे अवयव होत, हें पुढील उताऱ्यांत स्पष्ट आहेः—

कुसुमकेसररेणुमलिव्रजाःसपवनोपवनोत्थितमन्वयुः ॥९,४५

उपवनांत वारा घुसून तेथील फुलांच्या केसरांतील पराग उधळले. त्यांच्या मागे भुंग्यांचें तांडे धावले. ( रेणु=पराग )

पंडित रघुवीर यांनीं आपल्या परिभाषा-कोषांत आयरिसगणाला केसरकुल असें नाव दिलें आहे. तें त्यांनीच स्वीकारलेल्या तत्त्वांच्या अगदीं विरुद्ध आहे, हें आता ध्यानांत येण्याजोगे आहे. जुनी परंपरा राखावयाची हा रघुवीरांचा बाणा येथें पूर्णपणे ढासळला आहे. केशराला जुना शब्द कुंकुम असा आहे; केसर असा नाही. केसर म्हणजे परागधारण करणारे फुलांतील अवयव असा अर्थ संस्कृतांत रूढ आहे. परंतु केशर हें केसर नसतें हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. संस्कृतांत केसर हें एका वृक्षाचें नांव आहे. तो वृक्ष बकुल हा होय. हें नांवहि त्याचे फूल केसाळ असतें, त्याला बहुत केसर असतात, आणि पाकळयाहि केसासारख्याच असतात, या अवलोकनावरून पडलेलें आहे. केशर आणि केसर यांत कांही साम्य नाहीं; सर्व गोंधळ आहे. तो शास्त्रीय परिभाषेंत पक्का करणें हें पूर्णपणें रघुवीरप्रणीत तत्वाच्या विरुद्ध आहे. आयरिसच्या गणाला केशरावरून नांव द्यावयाचें तर तें कुंकुमकुल असें दिलें असतां शोभण्यासारखे आहे. संस्कृत टीकाकारांनी सरसकट केसर याला किंजल्क असा प्रतिशब्द वापरला आहे तो चुकीचा आहे.

कमलामध्ये मध्यवर्ती बिंब किंजल्कांचें असतें. त्याभोवती केसरांचें मंडल असतें आणि त्याभोवती प्रदलें-संदलें असतात. पराग केसरांत उत्पन्न होतात. अर्थात ते मध्यवर्ती बिंबाच्या परिसरांत दिसतात. परागांचे हें स्थान कवीने नेमकें वर्णन केलेलें पुढील अवतरणांत दिसून येतें.

काश्चित् कराभ्यमुपगूढनालम् आलोलपत्राभिहत-द्विरेफम् ।
रजोभिरन्तःपरिवेशवन्धि लीलारविन्दं भ्रमयांचकार ॥ रघु. ६.१३.

अंतःपरिवेष = आंतल्या बिंबाचा परिसर. पत्रें = संदलें व प्रदलें. रजस् = पराग

[ कुंकुम ११ ]

काम्भोजाः समरे सोढुं तस्य वीर्यमनीश्वराः ।
गजालानपरिक्लिष्टैः अक्षोटैः सार्धमानताः ॥ रघु. ४.६९

काश्मीरी लोक रघूच्या पराक्रमापुढें टिकूं शकले नाहीत. त्यांनीं नमतें घेतलें. अक्रोडाच्या झाडाला रघूचे हत्ती बांधले होते. त्यामुळें तींहि नमलीं.

अक्रोड हा एक मोठा सुगंधी वृक्ष असतो. त्याच्या फुलांना संदलें व प्रदलें हीं नसतात; पण परिदलें असतात, म्हणजे एकाच प्रकारचीं दलें केसर किंजल्क या भोंवतीं

असतात. केसरवन्त पुष्पें, आणि किंजल्कवंत पुष्पें, अशीं वेगवेगळीं देतात. पानांना दहा किंवा बारा दळें असतात. [ अक्रोट १२ ]

भूर्जेषु मर्मरीभूताः कीचकध्वानिहेतवः ।
गंगाशीकरिणो मार्गे मरुतस्तं सिषेविरे॥ रघु. ४. ७३

हिमालयावरील वाटेंत वारे वहात त्यांत गंगेचे तुषार असत. ते वारे बांबूमधून घुसताना मोठा आवाज होई आणि भूर्जतरूंच्या पानामध्यें मर्मर असा ध्वनि निघे.

भूर्ज हे भले मोठे वृक्ष हिमालयावर असतात. त्यांना केसरपुष्पें आणि किंजपुष्पें याचे वेगवेगळे घोस येतात. त्यांच्या फळांत एक एक बीज असून त्यांना दोन दोन पंख असतात. खोडाच्या सालीचे पातळ पापुद्रे निघतात, ते कांहींसे केळीच्या पानांसारखे दिसतात. हल्लींच्या कागदाप्रमाणें त्यांचा उपयोग लेखनसाहित्य म्हणून होत असे. भूर्जपत्र म्हणतात तें वास्तविक पान नसतें, साल असते. कवि भूर्जपत्र हा शब्द न वापरता भूर्जत्वचा असा शब्द वापरतो हें विशेष आहे. प्राचीन ग्रंथ पुष्कळसे भूर्जत्वचेवर लिहिलेले आहेत.

भूर्जत्वचः कुंजरबिंदुशोणाः व्रजन्ति लेखक्रियधोपयोगम् ॥ कुमार. १.७

हत्तींच्या अंगावरील डागाप्रमाणें तांबडया भूर्जाच्या सालींचा उपयोग लिहिण्याच्या कामीं होतो. [ भूर्ज १३ ]

विशश्रमुर्नमेरूणां छायास्वध्यास्य सैनिकाः ।
दृपतो वासितोत्संगा विषण्णमृगनाभिभिः ॥ रघु. ४. ७९

सैनिकांनी नमेरूंच्या छायेत दगडावर बसून विसावा घेतला. या दगडावर कस्तूरीमृग पूर्वी बसलेले असल्यामुळें त्यांच्या उंचवटयास सुवास येत होता.

ज्याच्या फळाचे रुद्राक्ष होतात ते तरु नमेरु असा तर्क आहे. कुमारसंभव काव्यांत शंकराचे गण नमेरूचीं फुलें कानावर ठेऊन बसले होते असें म्हटलें आहे. शंकर आणि रुद्राक्ष यांचें साहचर्य प्रसिद्ध आहे. त्यावरून नमेरु हा रुद्राक्ष असावा असें वाटतें. कदंबाला जशी एका गोटीवर अनेक बारीक बारीक फुलें येतात तशीं रुद्राक्षालाहि येतात. फळें सुकल्यावर रुद्राक्ष उरतात. [ नमेरु १४ ]

गणा नमेरुप्रसवावतंसा भूर्जत्वचः स्पर्शवतीर्दधानाः । कुमार. १.१.५५.

गणांच्या कानावर नमेरूंची फुलें होतीं आणि अंगावर सुखस्पर्श अशा भूर्जांच्या साली होत्या.

सरलासक्तमातंग–ग्रैवेयस्फुरितत्विषः ।
आसन्नोषधयो नेतुः नक्तमस्नेहदीपिकाः रघु. ६ ७५

सेनानायक रघूला जवळच असलेल्या ओषधींचा उपयोग तेलाविना दिव्यासारखा होई. सरलवृक्षांना हत्तींच्या गळ्यांतील साखळ्या अडकविल्या होत्या त्या देखील त्यांच्या उजेडांत चमकत. येथें ज्या ओषधी सांगितल्या आहेत त्या रात्रीं स्वयंप्रकाशी आहेत; म्हणजे त्या काजव्याप्रमाणें आरंभिक बाह्य प्रेरणेविना प्रकाश देतात असा समज आहे. असा समज करून घेतल्यानंतर मग या ओषधी कोणत्या असें एक कोडें उत्पन्न झालेलें आहे. परंतु असा समज करून घेण्याचें कारण नाहीं. ओषधींचा विशेष इतकाच कीं त्या तेलाविना दिव्याप्रमाणें जळतात. कवीच्या वेळीं तेलाचे दिवे सामान्यतः वापरीत हें उघडच आहे. अशा वेळीं हिमलयावर अशीं कांहीं झाडें होतीं कीं त्यांचीं लाकडें तेलावाचून एरवीच्या सतैल दीपाप्रमाणें जळत. सरळ आणि देवदारु हे असे वृक्ष आहेत कीं, त्यांच्या

लाकडांत स्वभावतःच तेल असतें. म्हणून तीं दिव्याप्रमाणें संथपणें जळतात. याचप्रमाणें आणखीहि कांहीं झाडें लाकडांत तेल असणारीं अशीं आहेत. त्याच या ओषधि किंवा महौषधि होत. हिमालयावरील वनचर लोक आजसुद्धां असलेच अतैल दीप वापरताना आढळतात. हीं झाडें इतरत्र होत नाहींत. म्हणून त्यांची विशेष प्रशंसा केलेली आहे. हें उघडच आहे. शमीमध्यें जसा अग्नि असतो म्हणून मागें सांगितलें तसाच या ओषधींच्या अंगीं प्रकाश असतो. आरंभिक चेतना दिल्यानंतर त्या तेल घातलेल्या दिव्याप्रमाणें प्रकाश देतात. वस्तुतः त्या स्वयंभू तैलदीप होत असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. असेच उल्लेख इतरत्र आहेत तेः—

भवन्ति यत्रौषधयो रजन्यां अतैलपूराः सुरतप्रदीपाः । कुमार. १.१०.
महौषधिं नक्तमिवात्मभासः प्रपेदिरे प्राक्तनजन्मविद्याः ।कु. १·३०
ज्वलितेन गुहागतं तमः तुहिनाद्रेरिव नक्तमोषधिः । रघु. ८. ५४.

( ओष=उष्मा. त्याचा संग्रह तो ओषधि अशी व्युत्पत्ति आहे. )

स ललितकुसुमप्रवालशय्यां ज्वलितमहौषधिदीपिकासनाथाम् ।
नरपतिरतिवाहयां बभूव क्वचिदसमेतपुरस्कृतः त्रियामाम् ।। ९.७० ।।

शेवटच्या अवतरणांत तर ज्वलित म्हणजे पेटलेली असें विशेषणच लावलेलें आहे. दशरथराजाच्या मृगयाप्रसंगाच्या वनानिवासाचें हें वर्णन आहे. एरवीं घरांत तेलाचे दिवे वापरले तरी इतरत्र, विशेषतः प्रवासांत, ते सोईचे नसतात; म्हणून महाग असलेले विजेचे हस्तदीप आज आपण वापरतों, त्याप्रमाणें राजाने वनानिवासांत महागाईचे पण सोईस्कर अतैल-दीप ठेवले होते, असें येथे कवि सांगत आहे.

वरील उताऱ्यापैकीं ज्यांत ज्वलित ( = जाळ ) असा शब्द नाहीं त्यांत काजव्या-प्रमाणें जाळाविना केवळ चमकणाऱ्या ओषधी असाहि अर्थ होऊं शकतो. तसाच करण्याची वहिवाटहि आहे. अशा तऱ्हेची भासुर उद्भिदें समुद्रकाठीं तसेंच हिमालयांत उष्ण आणि आर्द्र स्थळीं कुजत असलेल्या लाकडावर पाहिलीं असल्याचें कांहीं शास्त्रज्ञ सांगतात. परंतु हीं बुरशीच्या जातीचीं असतात त्यांस ओषधि, विशेषतः महौषधि, म्हणतां येईल कीं नाहीं शंका आहे. आसामांतील नागपर्वतावर कांहीं अकृत्रिम प्रकाश पाहिल्याचें कांहीं सैनिक सांगतात. तथापि या प्रकाशाचा उगम त्यांच्याही हातीं आल्याचें किंवा आटोक्यांत आल्याचें सांगत नाहींत. कांहीं रत्नें भासुर आहेत, तसेच कांहीं मत्स्य भासुर आहेत हें प्रसिद्ध आहे. भासुर ओषधि अद्याप हातीं आलेल्या नाहींत. त्या येईपर्यंत वर दिला आहे तोच अर्थ लावणें श्रेयस्कर आहे.

भास्वन्ति रत्नानि महौषधीं श्चपृथूपदिष्टां दुदुहुर्धरित्रीम् ।। १.२

असें कुमारसंभवांत हिमालयाचें महत्व सांगितलें आहे त्यांत भास्वत् हें विशेष रत्नांना लावलेलें आहे, ओषधींना नाहीं.

चकम्पे तीर्णलौहित्ये तस्मिन् प्राग्ज्योतिषेश्वरः ।
तद्गजालानतां प्राप्तैः सहकालागुरुद्रुमैः ।। रघु. ४.८१.

रघुराजा ब्रम्हपुत्रा नदी ओलांडून जातांच आसामाच्या राजाला कंप सुटला. त्याबरो-बरच रघूचे हत्ती बांधले गेल्यामुळे कालागुरु वृक्षहि कापूं लागले.

कालागुरु वृक्ष हिमालयांत आणि आसामांत असतात. त्यांचे लाकूड जळतांना सुगंध सुटतो. ते धूपनाकरतां वापरतात. [ कालागुरु १५ ]

स नर्मदारोधसि शीकरार्द्रैः मरुद्भिरानर्तितनक्तमाले ।
निवेशयामास विलंघिताध्वा क्लान्तं रजोधूसरकेतु सैन्यम् ॥ रघु. ५.४२.

वाटचालीने सैन्य थकलें आणि पताका धुळीने मळल्या, तेव्हा राजपुत्राने नक्तमालवनांत सैन्य उतरविलें.

नक्तमाल म्हणजे करंज. हा मोठा वृक्ष असतो. याचीं पानें त्रिदल किंवा पंचदल असतात. याच्या फुलांना थोडी जांभळी छटा असते. आकृति पळसफुलांसारखी असते. आकार लहान असतो. फुलें सायंविकाशी असतात. यावरून नक्तमाल नांव पडलें असावें. फळाच्या आकृतीवरून करंज हें नांव निघालें असावें. [ नक्तमाल १६ ]

तेषां महार्हासनसंस्थितानां उदारनेपथ्यभृतां स मध्ये ।
रराज धाम्ना रघुसूनुरेव कल्पद्रुमाणामिव पारिजातः ॥ र. ६.६

स्वयंवर मंडपांत उंची आसनावर बसलेल्या आणि थाटाचा वेष केलेल्या त्या मंडळीमध्ये रघुपुत्र अजच आपल्या तेजानें चमकत होता, जसा कल्पतरूंत पारिजात.

दक्षिण भारतांत जो तरु पारिजात म्हणून प्रसिद्ध आहे तो यूथिकांच्याच गणांतला पण भिन्न गोत्रांतला आहे. आकाराने लहान, क्वचित् झुडुप तर क्वचित् झाड. पानें साधीं लहान खरखरीत. फुलें एकेरी; पाकळ्या पांच किंवा अधिक; आरंभीं संयुक्त नलिकाकृति, केशरी रंगाच्या, विभक्त, पांढऱ्या; काटकोनांत वळलेल्या. आंत दोन केसर, एक किंजल्क, सुगंधी, सायंविकासी अशीं असतात. याच तरुला बंगाली लोक शेफाली म्हणतात. कालिदासाने हा तरू कल्पद्रुमापैकीं एक म्हणून सांगितला आहे, त्यावरुन तो त्या काळीं विशेष रूढ नव्हता असें दिसतें. समुद्रमंथनांत तो उत्पन्न झाला अशी पुराणकथा आहे. त्याच्या नांवाचा अर्थहि समुद्रपार उत्पन्न झालेला असा आहे. काठेवाड, राजपुताना, या भागांत तो वन्य स्थितींत आढळतो. इतरत्र अद्यापहि उपवन्यच आहे. यावरुन तो परदेशाहून आला असावा असें दिसतें. कृष्णाने तो इन्द्रापासून जिंकून घेतला अशी पुराणकथा आहे. त्यावरूनहि हेंच अनुमान निघतें. कालिदासाने पारिजाताचे केलेले उल्लेख, तो उत्तम पण दुर्मिळ तरु आहे अशा अर्थाचे आहेत. परंतु शेफालिका मात्र उपवनांत चांगली रूढ होती असा ऋतुसंहारांत उल्लेख आहे. बंगाली लोक तर पारिजात हा काल्पनिकच मानतात. कुमारसंभवांत पारिजात इंद्राच्या नंदनवनांत असल्याचा उल्लेख आहे.

तां पुलोमतनयालकोचितैः पारिजातकुसुमैः प्रसाधयन् । ( तां = पार्वतीम् )
नंदने चिरमयुग्मलोचनः सस्पृहं सुरवधूभिरीक्षितः ॥ कुमार ८.२७

[ पारिजात १७ ]

एवं तथोक्ते तमवेक्ष्य किंचित् विस्रंसिदूर्वांकमधूकमाला ।
ऋजुप्रणामक्रियथैव तन्वी प्रत्यादिदेशैनमभाषमाणा ॥ रघु. ३.२५.

याप्रमाणें सखीने सांगितल्यावर इंदुमतीने त्या राजाकडे किंचित् दृष्टिक्षेपण करून हातांतली दूर्वाभूषित मधूकमाला जरा खालीच सरकू दिली आणि सरळ नमस्कार करून त्याला नकार कळविला.

मधूक म्हणजे मोहडा. हा बकुळगणांतील वृक्ष आहे. याचीं फुलें बारीक, पांढुरकी आणि सुगंधी असतात. त्यापासून मद्य तयार करतात. याच्या फुलांची माळ विवाह प्रसंगीं वधूच्या केसांत बांधण्याची चाल होती, हें पुढील उताऱ्यांत दिसून येतें.

म. सा. प. (२१-४-२)

अनुक्रमणिका

धूपोष्मणा त्याजितमार्द्रभावं केशान्तमन्तःकुसुमं तदीयम्।
पर्याक्षिपत् काचिदुदारबंधं दूर्वावता पांडुमधूकदाम्ना ॥ कुमार. ७.१४

पार्वतीच्या वेषभूषेचें हें वर्णन आहे. [ मधूक १८ ]

अनेन सार्धं विहराम्बुराशेः तीरेषु तालीवनमर्मरेषु।
द्वीपांतरानीत-लवंगपुष्पैः अपाकृतस्वेदलवा मरुद्भिः ॥ रघु. ६.५७

या राजाबरोबर समुद्रतीरावर विहार कर. तेथे ताडांचीं झाडें आहेत. त्यांत मर्मर आवाज चालू असतो. तेथे जे वारे वाहतात ते तुझा स्वेद घालवितील. तेच वारे द्वीपान्तराहून लवंगा भरून आणणाऱ्या नौका चालवितात, बरें !

आपण ज्या लवंगा वापरतों त्या लवंगकलिका असतात. लवंगेचे काटे तीं संदलें होत. त्यावरील गुंडीवजा भाग असते त्यांतील बाहेरचे पापोद्रे तीं प्रदले होत. त्याच्या आंत केसर आणि मध्यवर्ती एक किंजल्क असतें. फूल उमलल्यावर सुगंध उडून जातो. तो टिकावा म्हणून कळ्याच काढतात. लवंगेचे डेख म्हणून जे समजतात तें किंज-मंडल असतें. तें चिरलें असता आंत बीजकें सापडतात. लवंग आणि जम्बू यांचा गण एक आहे. लवंगाची थोडीशी झाडें मलयपर्वतावर आहेत. कुमारसंभवकाव्यांत त्यांचा उल्लेख आहे. तो असाः—

तस्य जातु मलयस्थलीरतेः धूतचंदनवनः प्रियाक्रमम्। (तस्य=शंकरस्य)
आचचाम सलवंगकेसरश्चाटुकार इव दाक्षिणानिलः ॥ कु.८.२५

[ लवंग १९ ]

ताम्बूलवल्लीपरिणद्धपूगास्वेलालतालिंगितचंदनासु।
तमालपत्रास्तरणासु रन्तुं प्रसीद शश्वन् मलयस्थलीषु ॥ रघु. ६.६३.

मलयस्थलीमध्ये नागवेलींनी पूगतरूंना वेढलें आहे, चंदनांचा आसरा एलांनी घेतला आहे. तमालाच्या पानांचीं अंथरुणेंच झालीं आहेत. अशा रम्य देशीं मन कायम रमवशील तर बरें होईल.

तांबूलवल्ली आगंतुक मुळ्यांनी पकड घेऊन उंच चढते, पण विळखे घालीत नाही. एला तर नुसत्या टेकून राहतात, पकडीताहि नाहीत. म्हणून हें वर्णन अतिरिक्त आहे. तथापि, तें स्वयंवरप्रसंगीं वधूसखीने वधूस उद्देशून विनोदाने उच्चारलें आहे, म्हणून साजण्याजोगें आहे. येथें जे तमालवृक्ष उल्लेखिले ते कोकमगणांतील होत. यांच्या फुलांत चार चार संदलें व प्रदलें असतात. यांच्या लाकडांतून सुगंधी निर्यास निघतो. [ तमाल २० ]

इत्वेन हस्तं परिगृह्य वध्वाः स राजसूनुः सुतरां बभासे।
अनन्तराशोकलताप्रवालं प्राप्येव चूतः प्रतिपल्लवेन ॥ रघु. ७.२१

राजपुत्र अजाने वधूचा हात आपल्या हातांत घेतला तेव्हा एखाद्या उंची आंब्याने आपल्या पल्लवाने शेजारच्या अशोकावरील लतेच्या पल्लवाला स्पर्श करावा तशी शोभा दिसली.

येथे अशोकलता याचा अर्थ मल्लीनाथ मुळीच सांगत नाही; आधुनिक विद्वान लतेप्रमाणें सुकुमार अशोक असा अर्थ सांगतात. पण तो युक्त नाही. लता एका वृक्षावरून दुसऱ्या वृक्षावर जावी त्याप्रमाणें वधू पिता किंवा बंधू यांच्या घरांतून पतीच्या घरी जाते; असें येथे कवि सुचवीत आहे. लतावृक्षसमागम मनोहर असतो. तो उद्यानांत मुद्दाम घडवून आणण्याची चाल असे आणि आहेहि. त्याला अनुलक्षून ही भाषा आहे. दोन तरूंचा समागम सांगण्यांत स्वारस्य मुळीच नाही, लतावृक्षसमागम सांगण्यांतच आहे. शाकुंतल नाट-

कांत शकुंतला स्वतःस चंदनलता म्हणते तेथें चंदनाश्रित लता असाच अभिप्राय आहे. दुष्यंत हा चंदन आणि शकुंतला ही चंदनलता आहे. याचप्रमाणे सर्ग ९ मध्यें सहकारलता असा उल्लेख आहे तेथें सहकारावरील लता असा अर्थ करावा.

मलयतरून्मूलिता चंदनलतेव तातांकभ्रष्टा कथं जीवितं धारयिष्यामि । शा. ४.

अमदयत् **सहकारलता** मनः सकलिका कलिकामजितामपि ॥ रघु. ९. ३३

मिथुनं परिकल्पितं त्वया **सहकारः फलिनी** च नन्विमौ ।

अविधाय विवाहसत्क्रियामनयोर्गम्यत इत्यसांप्रतम् ॥ रघु. ८.६१

हा सुगंधी आम्र आणि ही फलिनी हें आपण जोडपें योजिलें होतें. त्यांचा मंगल विवाह लावल्यावांचून तूं स्वर्गाला गेलीस हें ठीक नव्हे !

फलिनी म्हणजे मागे ऋतुसंहारांत सांगितलेली प्रियंगुलता होय. येथें प्रकट झालेले विचार इतर काव्यांत आणि नाटकांतहि आढळतात. कुमारसंभवांत फलिनीफळाची उपमा उगवत्या चंद्रबिंबाला दिली आहे.

पश्य पक्व**फलिनी**-फलत्विषा बिंबलांछितवियत्सरोंभसा ।

विप्रकृष्टविवरं हिमांशुना चक्रवाकमिथुनं विडम्ब्यते कु० ८.६१

**स्मरतेव** सशब्दनूपुरं **चरणानुग्रह**मन्यदुर्लभम् ।

अमुना **कुसुमाश्रु**वर्षिणा त्वम**शोके**न सुगात्रि शोच्यसे ॥ रघु. ८.६३

तव **निश्वसितानुकारिभिर्बकुलै**रर्धचितां समं मया ।

असमाप्य विलासमेखलां किमिदं किन्नरकंठि सुप्यते ॥ रघु ८.६४.

हे सुंदरि, अशोकहि तुझा शोक करीत आहे पहा ! त्याची फुलें गळून पडत आहेत. जणो त्याला तुझ्या घुंगुरयुक्त पादाच्या स्पर्शाचीच आठवण होत आहे ! तुझ्या निश्वासाचें अनुकरण करणाऱ्या या बकुलपुष्पांची माला विलासाकरतां आपण गुंफीत होतों; ती अर्धवट टाकून, हे गायनकुशले, तू झोपलीस कशी ?

स्त्रियांच्या पादस्पर्शाने अशोक फुलतो आणि स्त्रियांनी मद्ययुक्त चुळा टाकल्यानें बकुल फुलतो असे कविसंकेत येथे व्यक्त झाले आहेत. ते संकेत कसे उत्पन्न झाले असावेत हें सहज समजेल, असे हे उद्गार आहेत. स्त्रिया आपल्या पायाला जो आळिता लावीत त्याप्रमाणें अशोकाचीं फुलें लाल असतात, आणि स्त्रियांच्या मुखाला मद्यपानाने जसा सुगंध येतो तसा बकुलाच्या फुलांना सुगंध असतो; म्हणून हे संकेत उत्पन्न झाले आहेत. अर्थात् ते मौज म्हणून कल्पिलेलेच आहेत. कवीनेच अन्यत्र म्हटलें आहे कीं:—

असूत सद्यः कुसुमान्यशोकः स्कंधात् प्रभृत्येव सपल्लवानि ।

**पादेन नापैक्षत सुंदरीणां संपर्कमा**शिंजितनूपुरेण ॥ कुमार. ३.२६.

कुसुमप्रसवाकरता अशोकतरूनी सुंदरीच्या पादस्पर्शाची वाट पाहिली नाही !

तस्य प्रसह्य हृदयं किल शोकशंकुः प्लक्षप्ररोह इव सौधतलं बिभेद । र. ८.९३

पत्नीवियोगाच्या शोकरूपी शंकूने त्याचें हृदय तडकलें; जसें गच्चीचे तळ पिंपळाच्या रोपानें तडकतें तसें.

येथें प्रबल भेदक म्हणून पिंपळाची उपमा दिली आहे, तर पुढें जटिल म्हणूनहि पिंपळाची उपमा दिली आहे. पिंपळाला पारंब्या येतात, त्या त्याच्या प्रधान खोडाला चिकटून वाढतात, आणि वडाला येतात त्या प्रधान खोडापासून दूर दूर राहातात. हा भेद लक्षांत घेता जटिल माणसाला वडापेक्षां पिंपळाचीच उपमा अधिक शोभते. पिंपरी, नांदुक, इत्यादि वृक्षां-

अनुक्रमणिका

नाहि पारंब्या येतात. त्या सर्वांना प्लक्ष संज्ञा लागू पडते. तथापि प्रस्तुत प्रसंगीं पिंपळच विवक्षित आहे.

श्मश्रुप्रवृद्धिजनिताननविक्रियांश्च प्लक्षान् प्ररोहजटिलानिव मंत्रिवृद्धान्. र. १३.७१

येथें मंत्र्यांना पारंब्या असलेल्या पिंपळांची उपमा दिली आहे. कारण त्यांनीं श्मश्रु वाढविली होती. [ प्लक्ष ] २१

व्याघ्रानभीरभिमुखोत्पतितान् गुहाभ्यः फुल्लासनाग्रविटपानिव वायुरुग्णान् ।

शिक्षाविशेषलघुहस्ततया निमेषात् तूणीचकार शरपूरितवक्त्ररन्ध्रान् । र.९.६३

फुललेल्या असनवृक्षाच्या हालत्या शाखेप्रमाणें दिसणारे वाघ समोरून धाऊन आले, परंतु मृगयानिपुण आणि शूर दशरथराजाने भाते बाणांनी भरावे तशीं त्यांचीं तोंडें बाणांनी भरून टाकली.

येथें असन म्हणजे अईन असें एक मत आहे. ( देसाईकृत औषधिसंग्रह पहा ) परंतु अईन हा ककुभ असावा असें ऋतुसंहाराविषयीं लिहितांना दर्शविलेंच आहे. मराठींत असाणा म्हणून एक झाड आहे. तेंच असन होय. हें झाडहि ककुभासारखें उंच वाढणारें आहे. याचा गण वेगळा आहे. [ असन २२ ]

संतानकमयी वृष्टिर्भवने चास्य पेतुषी । ( अस्य=दशरथस्य )

सन्मंगलोपचाराणां सैवादिरचना ऽ भवत् ॥ रघु.१०.७७.

रामजन्म झाला तेव्हां दशरथराजाच्या घरीं स्वर्गांतून संतानकपुष्पांची वृष्टि झाली. हाच मंगलोपचारांचा शुभारंभ म्हणावयाचा.

संतानक हा स्वर्गतरु म्हणून येथें उल्लेखिला आहे. त्याखेरीज हिमालयाच्या वनांतहि तो असल्याचे उल्लेख कुमारसंभवांत जागोजाग आहेत.

संतानकतरुच्छायासुतविद्याधराध्वगम् ।

यस्य चोपवनं बाह्य गंधवद्गंधमादनम् ॥ कुमार. ६. ४६ ( यस्य=ओषधिप्रस्थस्य )

संतानकाकीर्णमहापथं तत् चीनांशुकैः कल्पितकेतुमालम् । ( तत्=ओषधिप्रस्थम् )

भासोज्वलत् कांचनतोरणानां स्थानांतरं स्वर्ग इवाबभासे ॥ कु. ७.३.

यावरून एवढें निश्चित होतें की हा हिमालयविशिष्ट तरु असून छायावृक्ष शोभण्याइतपत मोठा असतो, उपवनांत मान मिळण्याइतपत सुशोभ असतो, आणि त्याला मंगलकार्यांत मान मिळण्याजोगी फुलेंहि येतात. हा तरु कोणता असावा हें कोडें अद्याप कोणी उलगडलें नाहीं. तथापि तर्कानें असें सांगतां येतें की हिमालयीन वृक्षापैकीं ज्याला ऱ्होडोडेन्ड्रॉन म्हणतात त्या गोत्रांतला हा वृक्ष असावा. या गोत्रांत वृक्षजाति चारच आहेत. त्या सर्वांस साधारण घंटाकृति तांबडी किंवा पांढरी सुंदर आणि विपुल फुलें येतात. हीं झाडें अन्यत्र उगवत नाहीत. यांच्या गोत्रांतील कॅनेडियन जाती उद्यानांत लावण्याची पद्धत आहे. कांहीं झुडपी जाती दक्षिणेंत मलयपर्वतावरहि आढळतात. हीं झाडें हिमालयांत इतकीं विपुल आहेत की त्यांचा उल्लेख देवदारू, सरल, इत्यादिकांबरोबर ब्रिटिश ज्ञानकोशांत केलेला आढळतो. संतानक हें नांव विपुलतेमुळेंच पडलेलें असावें. [ संतानक २३ ]

वीक्ष्य वेदिमथ रक्तबिंदुभिः बंधुजीवपृथुभिः प्रदूषिताम् ।

संभ्रमोऽभवदपोढकर्मणां ऋत्विजां च्युतविकंकतस्रुचाम् । रघु. ११.२५.

यज्ञवेदीवर दुपारीच्या फुलासारखे लाल मोठाले रक्ताचे थेंब पडल्याने ती दूषित झाली असें पाहून कामाला लागलेल्या ऋत्विजांच्या हातांतली विकंकताची पळी गळून पडली, इतका

गोंधळ उडाला. अहमदनगर जिल्ह्यांत वेहेकळ या नांवानें ओळखला जाणारा एक काटेरी वृक्ष आहे तो हा विकंकत होय. [ विकंकत २४ ]

अयःशंकुचितां रक्षः शतघ्नीमथ शत्रवे । ( रक्षःरावणः । शत्रवे=रामाय )
हृतां वैवस्वतस्येव कूटशाल्मलिमक्षिपत् ॥ रघु. १२. ९५.

लोहकंटकमय शतघ्नी नांवाचें हत्यार रावणानें रामावर फेकलें. तें अस्त्र म्हणजे यमापासून मिळविलेली एकादी काटेसावर म्हटली तर चालेल. सावरींत काटेरी आणि बिनकाटेरी असे प्रकार असतात. काटेरी प्रकारांत खोडाला मोठ मोठे जाड आणि आखूड असे कांटे असतात.

दूरादयश्चक्रनिभस्य तन्वी तमालतालीवनराजिनीला ।
आभाति वेला लवणाम्बुराशेः धारानिबद्धेव कलंकरेखा ॥ रघु. १३.१५.

समुद्राचा तीर तमाल आणि ताली यांच्या वनामुळें काळसर होऊन गेलेला आहे. दुरून त्याच्या जागीं लोहाच्या चाकोरी सारखी बारीक रेघ मात्र दिसत आहे.

मलयस्थलीच्या वर्णनांत जो तमाल सांगितला तोच हा तमाल समजावा. मलय पर्वत दक्षिणेस समुद्रापर्यंत पसरला आहे. अर्थात् त्यावरील झाडीहि तेथवर पोचलेली आहे.

आसारसिक्तक्षितिबाष्पयोगात् मामक्षिणोत् यत्र विभिन्नकोशैः ।
विडम्ब्यमाना नवकंदलैस्ते विवाहधूमारुणलोचनश्रीः ॥ रघु. १३.२९

या माल्यवान् गिरीवर पाऊस पडून भूमींतून वाफा निघत होत्या आणि कंदलांच्या कळया उमललेल्या होत्या. त्यांचा अरुण रंग दृष्टीस पडताच आपल्या विवाहप्रसंगीं अरुण झालेल्या तुझ्या नयनांची मला आठवण झाली.

येथें कंदल म्हणजे रानकेळी असा अर्थ करतात, परंतु रानकेळ या अर्थी कंदली असा शब्द असल्यामुळे कंदल याचा अर्थ कर्दळ असा करणें चांगलें. कर्दळीचा अंतर्भाव कदली शब्दांत होतो असें पूर्वी दाखविलेंच आहे. आता कर्दळ या अर्थी पृथक् शब्द कंदल हा आला आहे. कर्दळींतहि केळीप्रमाणेंच वन्य आणि उपवन्य प्रकार आहेत. कर्दळीच्या फुलांच्या कळया आणि पानांचे अंकुर यांचा रंग अरुण असतो. कोश या शब्दानें फुलांच्या कळया किंवा पानांचे अंकुर यापैकी कोणताहि अर्थ घेतला तरी चालेल. प्रस्तुत वर्णन पावसाळयाच्या आरंभाचें आहे हें ध्यानांत घेता पर्णांकुर हाच अर्थ अधिक योग्य आहे. [ कंदल २५ ]

अयं सुजातोऽनुगिरं तमालः प्रवालमासाद्य सुगंधि यस्य । ( गिरिः चित्रकूटः )
यवांकुरापांडुकपोलशोभी मयाऽवतंसः परिकल्पितस्ते ॥ रघु. १३. ४९

हा या चित्रकूटगिरीच्या काठचा सुंदर तमाल पहा. यवांकुराप्रमाणें पांढुरक्या तुझ्या गालाला सजवण्याकरता मी याची सुगंधी डिकशी तुझ्या कानावर बसविली होती.

पूर्वी उल्लेखलेल्या तमालाहून हा तमाल वेगळा आहे. पूर्वीचा तमाल कोकमगणांतला तर हा दालचिनीगणांतला आहे. याचीं सर्व अंगें सुगंधी असतात. याच्या फुलांच्या दलांत संदल, प्रदल असा भेद नसतो. दलें एकाच प्रकारचीं असून त्यांची नळी बनलेली असते. हा तमाल हिमालयांत आढळतो, तसा दुसरा आढळत नाहीं. [ तमाल २६ ]

त्वया पुरस्तादुपयाचितो यः सोऽयं वटः श्याम इति प्रतीतः ।
राशिर्मणीनामिव गारुडानां सपद्मरागः फलितो विभाति ॥ रघु. १३.५३.

पूर्वी ज्याची तूं पूजा केलीस तो हा श्यामनामक वड पहा. त्यावर लटकलेलीं पद्मासारखीं लाल फळें लाल मण्यांच्या राशीप्रमाणें दिसत आहेत. [ वट २७ ]

वरील विवेचनामध्यें धान्यें, गवत, लव्हाळें आणि त्याहूनहि क्षुद्र उद्भिदांकडे लक्ष्य दिलेलें नाही. आता त्यांचाहि परामर्श घेणें अवश्य आहे.

शरीरमात्रेण नरेन्द्र तिष्ठन् आभासि तीर्थप्रतिपादितर्द्धिः।
आरण्यकोपात्तफलप्रसूतिः स्तम्बेन **नीवार** इवावशिष्टः ॥ रघु. ५.१५.

राजा, पात्रीं दान करून धन संपून गेल्याने तुजजवळ केवळ शरीरसंपदाच शिल्लक राहिलेली दिसते. वनवासीयांनी फलभार काढून नेल्यावर नीवाराचा नुसता खुंट शिल्लक राहावा तशी ही तुझी अवस्था आहे !

नीवार म्हणजे देवभात. यापासून लागवडीने तांदूळ निर्माण झाला असें शास्त्रकार म्हणतात. [ नीवार २८ ]

अरुणरागनिषेधिभिरंशुकैः श्रवणलब्धपदैश्च **यवांकुरैः** ।
परभृताविरुतैश्च विलासिनः स्मरबलैरबलैकरसाः कृताः ॥ रघु. ९.४३.

अरुणवर्णापेक्षाहि आकर्षक वर्णाचीं वस्त्रें, कानावर ठेवलेले यवांकुर, आणि कोकिलांचे आलाप अशा त्रिविध उद्दीपनामुळे विलासी लोकांना स्त्रियांशिवाय कांही सुचेनासें झालें !

यव म्हणजे सातु. याचें पीक हिवाळ्यांत येतें. तथापि, येथील उल्लेख मधुमासांतील आहे. त्यावरून याहि ऋतूंत ते पिकवीत असें दिसतें.

यव हें गोधूमाच्या पूर्वी प्रचारांत आलेलें धान्य आहे. वन्य यव हिमालयावर आजहि आढळतात. [ यव २९ ]

संविष्टः **कुश**शयने निशां निनाय । रघु. १.९५.

राजा कुशाच्या चटईवर निजून रात्र घालवी. [ कुश ३० ]

मुखेन सीता शरपांडुरेण आनंदयित्री परिणेतुरासीत्। रघु. १४.२६

गर्भधारणेनें सीतेचे मुख शराप्रमाणें पांडुरकें झालें. तें पाहून पतीला आनंद झाला. [ शर = दर्भ ? ]

नृत्यं मयूराः कुसुमानि वृक्षाः **दर्भा**ठुपात्तान् विजहुर्हरिण्यः। रघु. १४.६९

सीतेचें दुःख पाहून, मोरांनी नाचणें, वृक्षांनी फुलें, आणि हरिणींनी दर्भ, टाकून दिले ! [ दर्भ ३१ ]

**मुस्ता**प्ररोहकवलावयवानुकीर्णं जग्राह स द्रुतवराहकुलस्य मार्गम्। रघु. ९.५९

डुकरांचा कळप तोंडांतील मुस्तांचे घास सांडीत पळूं लागला. राजाने त्यांचा पाठलाग केला.

मुस्ता म्हणजे नागरमोथा. ही लव्हाळ्याची एक जात आहे. [ मुस्ता ३२ ]

शैलोपमः **शैवल**मंजरीणां जालानि कर्षन् उरसा स पश्चात्।रघु. ५.४६

शेवाळ्यांची लांबलांब जाळीं उराने मागून ओढीत ओढीत तो हत्ती, नदीच्या काठाशी आला.

अमी शिरीषप्रसवावतंसाः **शैवाल**लोलान् छलयन्ति मीनान्। रघु. १६.६१

हे शिरीषरूपी अलंकार शैवाळ्याला लोभावलेल्या माशांची फसवणूक करीत आहेत ! शैवाल आणि शैवल यामधील भेद स्पष्ट नाही. [ शैवाल, शैवल ३३ ]

**शैलेय**जालपरिणद्धशिलातलौघान् दृष्ट्वा जनः क्षितिभृतो मुदमेति सर्वः ।

ऋ. ६.२५

शिलातलावरून पाणी चाललें आहे. सभोवार दगडफूल उगवलें आहे. हें पाहून सर्वांना आनद होत आहे.

शास्त्रीयदृष्ट्या दगडफुलांत दोन प्रकारचे जीव समाविष्ट असतात. एक आळिंब आणि दुसरा बुरशी. अळिंब खतपाण्यावर जगणारें आहे. त्याच्या अंगीं हिरवे दाणे असतात. त्यांच्या योगाने तें खतपाण्यापासून गात्ररस उत्पन्न करतें. या रसाचाच कांही भाग आयता घेऊन बुरशी आपलें जीवन चालविते. बुरशीच्या अंगीं चिकटा असतो. त्यामुळे अळिंब दगडास चिकटून राहतें. [ शैलेय ३४ ]

कर्तुं यच्च प्रभवति महीमुच्छिलीन्ध्रामवन्ध्याम् ।
तत् श्रुत्वा ते श्रवणसुभगं गर्जितम्.... ॥ पूर्वमेघ ११

मेघा, तुझें गरजणें ऐकलें की भूमीवर छत्र्या उगवणार आणि धान्यादिकांनी ती फलवती होणार असें समजतें. [ शिलीन्ध्र ३५ ]

दूर्वांचा उल्लेख मधूकाबरोबर आहे तो जमेस धरावा. [ दूर्वा ३६ ]

येथें चर्चिलेल्या ३६ उद्भिदांखेरीज आणखी कांहींचे उल्लेख प्रस्तुत महाकाव्यांत आहेत. त्यांची चर्चा पूर्वीच्या लेखांत केलेलीच आहे. ही सर्व चर्चा लक्ष्यांत घेता आढळून येतें कीं, वनश्रीच्या अंगोपांगांचीं सर्व वर्णनें, मग तीं साक्षात् असोत कीं आनुषंगिक असोत, मार्मिक आहेत. त्यांत एकादें संदिग्ध आहे; परंतु चुकीचें एकहि नाहीं. निसर्गाशी समरस असणारानेच तीं लिहिलीं असली पाहिजेत, याविषयीं शंका बाळगण्यास जागा नाहीं.

## उद्भिदांचें नामकरण

| [illegible] काव्यांतील नांव व पर्याय | लेखांतील क्रमांक | शास्त्रीय नांव | | शा. नांव देणा-रांचें नामचिन्ह |
|---|---|---|---|---|
| | | गोत्रनाम व त्याचा अर्थ | जातिनाम व त्याचा अर्थ | |
| अक्षोट<br>अक्रोड | १२ | Juglans | ragia<br>श्रेष्ठ | L |
| असन | २२ | Bridelia<br>( संस्मरणार्थ ) | retusa | Spreng. |
| एला<br>वेलदोडा | ६ | Elettaria<br>एला | cardamomum | Mat. |
| कन्दल<br>कर्दळ | २५ | Canna<br>यष्टि | indica<br>हिंदी | L. |
| कालागुरु<br>अगरु | १५ | Aquilaria<br>अगरुप्रदल | agalocha<br>अगरु | Roxb. |

अनुक्रमणिका

| काव्यांतील नांव व पर्याय | लेखांतील क्रमांक | शास्त्रीय नाम | | शा. नांव देणारांचे नामचिन्ह |
|---|---|---|---|---|
| | | गोत्रनाम व त्याचा अर्थ | जातिनाम व त्याचा अर्थ | |
| कुङ्कुम केशर | ११ | Crocus (ग्रामनाम) | sativus उप्त | L. |
| कुश | ३० | Poa तृण | cynosuroides श्वतृणसदृश | Retz. |
| खर्जूरा | ८ | Phoenix (ग्रीक) | dactylifera खर्जूरप्रद | Linn. |
| चन्दन | ७ | Santalum चंदन | album श्वेत | L. |
| तमाल | २० | Garcinia (संस्मरणार्थ) | Morella | Desr. |
| तमाल | ३६ | Cinnamomum (अरबी नाम) | tamala तमाल | Fr. & Nees. |
| ताम्बूली नागवेली | २ | Piper (लॅटीन) | betle पान | L. |
| दर्भ (=शार?) | ३१ | Saccharum शर्कर | arundinaceum यष्टिरूप | Retz. |
| दूर्वा | ३६ | Cynodon श्वदन्त | dactylon | Pers. |
| द्राक्षा | १० | Vitis उत्तम उद्भिद | vinifera मद्यप्रद | L. |
| नक्तमाल करंज | १६ | Pongamia (मलबारी नाम) | glabra गुळगुळीत | Vent. |
| नमेरु रुद्राक्ष | १४ | Elaeocarpus ऑलीव फल | ganitras | Roxb. |
| नारिकेल नारळ | ३ | Cocos (पोर्तुगीज) | nucifera कठिणफली | Linn. |
| नीवार देवभात | २८ | Trachys खरखरीत | mucronata आकुंचित | Pers. |
| पारिजात | १७ | Nictanthus नक्तपुष्प | arbor tristis रात्रपुष्पी वृक्ष | L. |

| काव्यांतील नांव व पर्याय | लेखांतील क्रमांक | शास्त्रीय नांव | | शा. नांव देणाराचे नामचिन्ह |
|---|---|---|---|---|
| | | गोत्रनाम व त्याचा अर्थ | जातिनाम व त्याचा अर्थ | |
| पुन्नाग<br>उंडी | ९ | Calophyllum<br>चारुपर्ण | inophyllum<br>स्पष्टसिरापर्ण | L. |
| पूग<br>(=राजताली | ४ | Areca<br>सुपारी | catechu<br>कषाय | L. |
| प्लक्ष<br>पिंपळ | २१ | Ficus<br>प्लक्ष | religiosa<br>धार्मिक | L. |
| भूर्ज | १३ | Betula<br>भूर्ज | bbojapatra<br>भूर्जपत्र | Wall |
| मधूक | १८ | Bassia<br>( संस्मरणार्थ ) | latifolia<br>रुंदपानी | R. |
| मारीच<br>मिरा | ५ | Piper<br>तांबूली | nigrum<br>कृष्ण | L. |
| मुस्ता<br>नागरमोथा | ३२ | Cyperus<br>मोथा | rotundus<br>वाटोळा | L. |
| यव<br>सातु | २९ | Hordeum<br>( लॅटीन ) | vulgare<br>सामान्य | L. |
| लवङ्ग | १९ | Caryophyllus | aromaticus<br>सुवासिक | L. |
| वट<br>वड | २७ | Ficus<br>प्लक्ष | bengalensis<br>बंगाली | L. |
| विकङ्कत<br>वेहेकळ | २४ | Flacourtia<br>( संस्मरणार्थ ) | sapida<br>रुच्य | Roxb. |
| शमी | १ | Prosopis | spicigua | L. |
| सन्तानक | २३ | Rhododendron | ? | |

———

डॉ. वा. भा. पाठक यांचा प्रबंध

# टीका आणि टीकाकार

लें० — श्रीकृष्ण के० क्षीरसागर

(प्रका० नॅशनल इन्फर्मेशन पाब्लिकेशन्स, लि०, मुंबई. पृ० ४८४ किं. बारा रुपये.)

सदर ग्रंथ वाडिया कॉलेजमधील मराठीचे प्रोफेसर आणि एक नाणावलेले साहित्यिक प्रो. पाठक यांनीं पीएच्. डी. पदवी — परीक्षेकरितां लिहिला, व त्या ग्रंथावरूनच त्यांस मुंबईविद्यापीठाची पीएच्. डी. ची पदवी मिळाली आहे.

आजकाल बी. ए., एम्. ए. सारख्या वरच्या परीक्षांकरितां मराठी घेणाऱ्या विद्यार्थ्यांना टीकाशास्त्राचा अभ्यास करण्यास मराठी ग्रंथ नाहींत. म्हणून इंग्रजी अगर संस्कृत ग्रंथ वाचावे लागतात. ही अडचण दूर करणें हाहि या ग्रंथाचा एक उद्देश आहे, असें ग्रंथाच्या विषययोजनेवरूनही दिसतें, आणि ग्रंथासोबत छापलेल्या अभिप्रायावरूनही दिसतें.

मराठीच्या टीकाशास्त्रांसंबंधीं ज्या कल्पना प्रचलित आहेत, त्यांचाही निर्देश प्रस्तुत ग्रंथावर अभिप्राय देणाऱ्या विद्वानांनीं केलेला आहे. त्यावरून असें दिसून येईल कीं, स्वतंत्र मराठी टीकाशास्त्र निर्माण होण्याची आवश्यकता मराठीच्या अभिमान्यांस वाटत आहे; व तें निर्माण होईपर्यंत संस्कृत आणि इंग्रजी टीकाशास्त्राची मदत घेणें जरूर आहे, असेंही त्यांचें मत आहे. "मराठीचें" टीकाशास्त्र आणि "मराठींतून" टीकाशास्त्र या दोन्हीं कल्पनांचा आणि आकांक्षांचा उल्लेख आजकाल पुनःपुनः होत असतो. पैकीं उत्तरोक्त आकांक्षा—म्हणजेच मराठींतून टीकाशास्त्र उपलब्ध व्हावें, ही आकांक्षा—पुरी करणें हा या ग्रंथाचा एक उद्देश दिसतो.

हा उद्देश मोठाही आहे आणि अवघडहि आहे. तथापि प्रबंध लिहिणें आणि उपयुक्त पाठ्यपुस्तक लिहिणें या दोन गोष्टी एकाच ग्रंथाच्या द्वारें साधणें कठीण असतें. प्रबंधाच्या द्वारें टीकाशास्त्रासारख्या अवाढव्य विषयांतील सर्व प्रश्नांचा परामर्श घेणें अशक्यप्राय असतें. टीकाशास्त्रांतील एकाद्या प्राणभूत (vital) प्रश्नासंबंधीं प्रगत अभ्यासकास जेव्हां कांहीं नवीन उपपत्ती मांडण्याची आवश्यकता भासते, तेव्हां ती उपपत्ति तो "थीसिस्"च्या-अथवा "प्रतिपाद्य"च्या स्वरूपांत विद्वानांना सादर करतो, अशी प्रबंधलेखनाची स्थूल कल्पना सांगतां येईल. त्या विशिष्ट प्रतिपादनाला पोषक विवेचन म्हणून प्रबंधलेखक इतर वाङ्मयीन प्रश्नांचाही उल्लेख करील. तथापि विशिष्ट वर्गांतील विद्यार्थ्यांना आवश्यक असे सर्व प्रश्न 'उरकून घेणें' हें जसें पाठय पुस्तकांच्या लेखकाचें उद्दिष्ट होऊं शकेल, तसें प्रबंध लेखकाचें होऊं शकणार नाहीं. उण्यापुऱ्या पांचशे पानांचा हा "शास्त्रग्रंथ" वाचतांना, अर्थातच अधीत वाचक "यांतील 'थीसिस्' उर्फ प्रतिपाद्य कोणतें ?" हाच प्रश्न प्रामुख्यानें डोळ्यापुढें ठेवील. आणि एकदां डॉ. पाठक यांचें प्रमुख प्रतिपाद्य गवसलें, म्हणजे तें सुव्यक्त आहे कीं नाहीं; ग्रंथविषय होण्याइतकें महत्वाचें आहे कीं नाहीं; नवीन आहे कीं नाहीं;

आणि ग्रंथांतील सर्व अंगोपांगें त्या प्रतिपाद्याच्या प्रतिपादनाला आवश्यक आहेत किंवा कसें ? —हे प्रश्न विद्वान वाचकास सोडवावे लागतील.

" मानसशास्त्राच्या आणि सौंदर्यशास्त्राच्या दृष्टिकोनांतून एकंदर टीका या वाङ्मय-प्रकाराचें शास्त्रीय पद्धतीनें विवरण करणें " हा या पुस्तकाचा प्रधान हेतु आहे, असें डॉ. पाठक यांनीं आपल्या प्रस्तावनेंत सांगितलें आहे. " कला म्हणजे काय ? " " काव्य म्हणजे काय " " रस म्हणजे काय ? " या व्यापक आणि मूलभूत प्रश्नांसारखाच एक महत्वाचा प्रश्न डॉ. पाठक यानीं स्वतःपुढें ठेवला असावा. आणि तो प्रश्न म्हणजे— " टीकावाङ्मय म्हणजे काय ! "

या प्रश्नाचें विवेचन करतांना त्यांस "वाङ्मयास्वाद" या मनोव्यापाराची मीमांसा करावी लागली आहे. व ती करतांना, कलावन्त आणि रसिक यांची " अभिरुचि " कोणतें कार्य करते; किंबहुना, कोणतें कार्य करणारी शक्ति म्हणजे " अभिरुचि " याचें विवेचन करावें लागलें आहे. अभिरुचीच्या सुसंस्कृततेचा व सुसंपन्नतेचा विचार करतांना त्यांना कलावन्ताच्या आणि टीकाकाराच्या व्यक्तिमत्त्वाचाहि विचार करावा लागला आहे.

डॉ. पाठक यांच्या ग्रंथाच्या प्रारंभींच्या भागावरून, ते एकादा महत्त्वाचा प्रश्न आणि त्यासंबंधींची स्वतःची उपपत्ति यांच्या अनुरोधानेंच संपूर्ण ग्रंथाची रचना करतील अशी कल्पना होते. परंतु त्यानंतरच्या भागांत त्यांनीं विशिष्ट प्रतिपादनाची साखळी सोडून देऊन, सर्वसामान्य टीकाविषयक प्रश्न आठवतील तसतसे उपस्थित केले आहेत, असें वाटल्यावांचून राहात नाहीं. सारांश या ग्रंथाचें " प्रबंधा " चें, म्हणजे विशिष्ट उपपत्तीच्या एकसूत्री प्रति-पादनाचें, स्वरूप फारच अल्पकाळ टिकतें; आणि पुढें टीकाविषयक सर्वसामान्य पुस्तकाचें स्वरूप त्यास प्राप्त होतें.

डॉ. पाठक यांस महत्त्वाच्या टीकाविषयक प्रश्नांवर सांगण्यासारखीं मतें नाहींत, असा वरील अभिप्रायाचा अर्थ नव्हे. त्यांनीं अनेक जागीं अनेक जटिल प्रश्नांवर मार्मिक विचार व्यक्त केले आहेत. पण एका मध्यवर्ती सिद्धांतांतून, उपपत्तींतून किंवा दृष्टिकोणांतूनहि ते मार्मिक विचार अपरिहार्यत्वानें निघतात असें दिसत नाहीं;— नव्हे, असें दाखविण्याची आवश्यकता आहे हेंहि ग्रंथकाराच्या मनांत वागत असलेलें दिसत नाहीं.

जागजागीं केलेल्या विवेचनावरून ग्रंथ-लेखक रसिक, मार्मिक आणि खऱ्या ( अर्थात् ललित ) साहित्यनिर्मितीचा अनुभव घेतलेला आहे, हें सहज दिसून येईल.

अभिरुचि, निवड, व्यक्तिमत्त्व यांच्या परस्पर संबंधांचें विवेचन; भाषाशैली, रस, स्वभाव व्यक्तिमत्व, यांच्या परस्परसंबंधाचें विवेचन, यावरून डॉ. पाठक यांचा मूलभूत दृष्टिकोन निर्दोष आणि अनुभवजन्य आहे असें पटल्यावांचून रहात नाहीं. वाङ्मयानंदमीमांसेच्या सनातन प्रश्नांत त्यांनीं स्वीकारलेला दृष्टिकोन, आणि केलेलें विवेचनहि, ते काव्यलेखनाचा गूढ आनंद भोगलेले लेखक आहेत या गोष्टीचीच साक्ष देतें. या चिरचर्वित प्रश्नासंबंधीं आतां सर्वस्वी नवीन उपपत्ति सांगणें अशक्यप्राय आहे. तथापि उपलब्ध उपपत्तींपैकीं कोणत्या उपपत्तीकडे लेखकाचा कल आहे, यावरूनहि लेखकाच्या मार्मिकतेचा बोध होऊं शकतो. डॉ. पाठक यांनीं पत्करलेली " संयमनशील सहानुभवा"ची उपपत्ति त्यांच्या मार्मिकतेची द्योतक आहे असें आम्हीं या दृष्टीनेंच म्हणतों.

तथापि डॉ. पाठक हे एक रसिक काव्यमर्मज्ञ, काव्याध्यापक, आणि काव्यलेखक आहेत या गोष्टीचा पुरावा, एवढेंच या पुस्तकाचें जीवितकार्य ठरल्यास त्याच्या जनकाला समाधान होईल असें आम्हांस वाटत नाहीं. कारण पाठकांचे हे गुण पुण्यांतील समव्यवसायी मंडळींस तरी आधींच माहीत आहेत. पण त्यांचा हा ग्रंथ प्रबंध या दृष्टीनें—म्हणजेच एकादी महत्वाची उपपत्ति किंवा निदान विचारसरणी, तर्कशुद्धपणें मांडणारा विद्वन्मान्य ग्रंथ या दृष्टीनें— पारखायचा म्हटल्यास त्यांत निश्चित एक प्रतिपाद्य, आणि त्याचें एकसूत्री प्रतिपादन आढळत नाहीं असेंच म्हणावें लागेल. त्यानंतर दुसरी दृष्टि म्हणजे वाङ्मयाच्या विद्यार्थ्यांना उपयुक्त अशा प्रश्नांची चर्चा करणारा ग्रंथ म्हणून त्यांचें परीक्षण करण्याचां. पण खेदाची गोष्ट म्हणजे या दृष्टीनेंहि हा ग्रंथ फारच सदोष आणि विस्कळित आहे, असें आढळून येतें.

स्वतः कवि असलेल्या, मार्मिक रसज्ञ असलेल्या, आणि अनुभवी अध्यापक असलेल्या लेखकाच्या, परिश्रमपूर्वक लिहिलेल्या या प्रबंधांत, हे दोष कोणत्या प्रकारें आणि कोणत्या कारणानें शिरले आहेत, याचें विवेचन केल्याखेरीज अर्थात्‌च या ग्रंथाचें खरें परीक्षण होणार नाहीं.

आपल्या स्वतःच्या दीर्घविचारान्तीं ठरलेल्या प्रतिपाद्याच्या अनुरोधानें ग्रंथ न लिहितां, गेल्या दहापांच वर्षांत ज्या ज्या टीकाविषयक कल्पना प्रमुख टीकालेखकांनी उच्चारल्या आहेत त्यांचा, वाकडी वाट करून, परामर्श घेण्याचा प्रयत्न करणें हेंच या ग्रंथांतील अनेक ठिकाणच्या अप्रस्तुततेचें आणि तुटकपणाचें (Abruptness) कारण असावें. पण त्याहिपेक्षां दोषास्पद बाजू म्हणजे विधानें, संज्ञा, आणि उल्लेख यांतील ढिलेपणा.

प्रथम एका त्यांतल्या त्यांत कमी दोषास्पद आणि तरीहि स्वभावनिदर्शक अशा उदाहरणाचा उल्लेख करतों. वाङ्मयीन कलाकृती या केवळ सहजस्फूर्त नसतात, हें मत मांडतांना आदिकवि वाल्मीकीच्या प्रसिद्ध श्लोकोद्गाराचें उदाहरण देऊन लेखक म्हणतात, " आदिकवि वाल्मिकि यानें क्रौंचवधप्रकरणीं जे उद्गार काढले, ते सहजोद्गार आहेत कीं मननाच्या अवस्थेंत निर्माण झाले आहेत यामध्यें मतभेद दिसून येतो. " वास्तविक लेखकास असें सुचवायचें आहे कीं सहजस्फूर्त काव्याचें जें सर्वमान्य गणलें गेलेलें उदाहरण त्यासंबंधींहि प्रो. वामनराव जोशी यांनीं कांहीं शंका काढल्या आहेत. पण लेखकाच्या विधानावरून मात्र असें वाटतें कीं वामनरावांना एका प्रसंगीं सुचलेला कोटिक्रम म्हणजे जणूं वाल्मीकीच्या प्रसिद्ध श्लोकासंबंधींचा सार्वत्रिक मतभेदच होय !

ढिलीं विधानें आणि विपर्यस्त अभिव्यक्ति यांची मजल या प्रबंधांत कोठपर्यंत गेली आहे, हें दाखविण्याकरितां आतां अगदीं दुसऱ्या टोकाचें एक उदाहरण देतों.

पंधराव्या प्रकरणाच्या प्रारंभीं (पृ. ४५९) पुढील विधान आढळतें. "साधारणपणें **प्लेटोला** (खि. पू. ४२८–३४८) **इंग्रजी वाङ्मयाच्या टीकाकारांत** पहिलें स्थान मिळतें,"*

या विधानांतील ढिलेपणा अज्ञाननिदर्शक नसलाच तर ( ग्रंथकाराच्या इच्छेप्रमाणें ग्रंथ तरुण विद्यार्थ्यांच्या हातीं पाठ्य पुस्तक म्हणून दिला गेल्यास ) अज्ञानपोषक तरी खास

* जाड ठसे मुळांत नाहींत; या विवेचनाच्या सोईकरितां परीक्षणलेखकानें ठिकठिकाणीं योजले आहेत.

आहे ! विद्यापीठास सादर केलेल्या ग्रंथांत अशी विधानें असणें, आणि ग्रंथ परीक्षित व प्रकाशित होऊन जाईपर्यंत तीं तशींच रहाणें, खरोखरच शोचनीय होय !¹

"एकाद्या ग्रंथकाराला एकादाच रस कां चांगला साधतो, याचें कारणहि विशिष्ट विषयाशीं समरस होण्याचें त्याच्या दृष्टिकोनाचें मर्यादित बल असेंच म्हणतां येईल." (पृ. ७५)

या विधानांतील 'दृष्टिकोन' या शब्दानें लेखकाला काय अभिप्रेत आहे हें नक्की समजलें नाहीं, तर तो इंग्रजी संज्ञेच्या भाषांतराचा अपुरेपणा असें म्हणता येईल. पण त्यापुढें महाभारतांतील एका सुंदर आणि सुप्रसिद्ध प्रसंगाचा निर्देश करून लेखक म्हणतात, "फार काय पण, एका प्रसंगीं सौंदर्यदर्शनानें पुलकित होणारी चित्तवृत्ति त्याच व्यक्तीला जशीच्या तशीच पुनः प्रकट करतां येईल किंवा काय या विषयीं शंकाच आहे. श्रीकृष्णानें अर्जुनाला एकदांच गीता ऐकविली, पुन्हा त्याची त्यालाच ती सांगणें कठीण होऊन बसलें. **महाभारतकारानें कलावंताच्या दृष्टिकोनाचें** येथें चांगलें निदान केलें असें वाटतें." (पृ. ७६) यांतील शेवटच्या विधानांत दृष्टिकोन हा शब्द कोणत्या अर्थानें वापरला आहे याचा बोध होणें कठीण आहे !

"दृष्टिकोन" या शब्दाप्रमाणेंच, "अनुभव" या शब्दाच्या डॉ. पाठक यांच्या-अभिप्रेत अर्थाचा बोध होत नाहीं. पुढील विधान पाहा. "वाङ्मयीन सौंदर्याच्या अनेकांनीं अनेक व्याख्या केलेल्या आढळतात. त्यावरून त्या त्या व्याख्याकारांचा **वाङ्मयाकडे पहाण्याचा अनुभव मात्र प्रकट होतो.**" (पृ. ७८)

वाङ्मयाकडे पहाण्याचा "अनुभव" म्हणजे काय, याचा बोध वाचकांना होणें कठीण आहे !²

विवेचनांतील ढिलेपणा, तुटकपणा, विषयांतर वगैरे विविध दोषांच्या दृष्टीने "टीका-लेखनाच्या विविध पद्धति" हें प्रकरण (प्र. ७) नमुनेदार आहे. या प्रकरणांत विविध टीका-पद्धतींची व्यवस्थित माहिती तर हातीं लागत नाहींच; पण पुढील विधानासारखीं आश्चर्यकारक विधानें आढळतात.

"सारांश, शास्त्रीय टीकापद्धति आणि कलात्मक टीकापद्धति या दोन्हींचा उपयोग टीकाकाराला कारणपरत्वें करावा लागतो; **शास्त्रीय स्वरूपाच्या ग्रंथविवेचनास विशेषतः**

---

१ पृष्ठ ८४ वरील "ह्या सर्व विचारसरणीवरून **क्रोचे यास** सौंदर्य हें आत्मनिष्ठ आहे असें **वाटत होतें** असें दिसतें." या विधानांतील ढिलेपणावरून लेखक क्रोचे या जगप्रसिद्ध तत्ववेत्त्यास दिवंगत लेखकांत अन्तर्भूत करतातसें दिसतें !

२ पृ. १४८ वरील पुढील दोन विधानावरूनही मोघम गुंतागुंतीपलीकडे कशाचाच बोध होत नाहीं. "इंग्रजी टीकाकारांतही प्लेटो आणि अरिस्टॉटल् यांच्याच **सिद्धान्तावर** ॲडिसनच्या उदयापर्यंत वाङ्मयचर्चेचे नियम कसे **पाळले** जात होते हें दिसून येतें."

"सामाजिक अभिरुचीच्या प्रगमनशील चक्रांत नव्या जुन्याची ढकलगाडी एकसारखी पुढे मागे होत रहाणारच." तसेंच पा. ५३ वरील विधान "त्यांनीं मनोविश्लेषणाच्या आधारें वैयक्तिक आणि सामाजिक **अन्यायाची तरफदारी** करून नवमतवादाचें निशाण मराठी वाङ्मयांत दृढमूल केलें."

पहिल्या प्रकारची, तर ललित-वाङ्मयाच्या विवेचनास दुसऱ्या प्रकारची टीकापद्धति विशेषतः उपयुक्त होईल; यासंबंधींचें विवेचन आतापर्यंत केलें आहेच. " (पृ. १५७)

शास्त्रीय स्वरूपाच्या ग्रंथांना कोणत्या प्रकारची टीकापद्धति लावावी, हा प्रश्न विवाद्य उरलेला नाहीं; आणि कांहीं दृष्टींनीं तो तसा असलाच तर त्याचें उत्तर पाठकांच्या ग्रंथाच्या कक्षेंत येत नाहीं. प्रत्यहीं नवें रूप धारण करणाऱ्या ललित साहित्याची खरी परीक्षा पृथक्करणात्मक आणि परंपरागत टीकापद्धतीनें होऊं शकेल काय, हा टीकाशास्त्रांतील महत्त्वाचा प्रश्न आहे. त्यावर टीकालेखकांत भिन्न तट पडून संप्रदायहि निर्माण झाले आहेत. या प्रश्नाच्या एका अंगावर याच ग्रंथकारानें अन्यत्र (पृ. ८०) मार्मिक आणि सूचक विचार व्यक्तही केले आहेत. पण त्यानंतर सुमारें पाऊणशें पानें ओलांडल्यावर वर उद्‌धृत केलेला निरुपयोगी आणि निरुपद्रवी निर्णय वाचावयास सांपडतो !

प्रतिपाद्यांतील एकतेचा अभाव; विवेचनांतील तार्किक संगतीचा अभाव, मुख्या-पृथक्-विधानांतहि व्यवस्थित अर्थाचा अभाव, यांसारख्या दोषांतच विचित्र, संदिग्ध, अगर अर्थशून्य पारिभाषिक शब्दांचीही भर पडली आहे. व या सर्वांचा परिणाम म्हणजे ग्रंथांतील वाचनीय विवेचनाच्या मानानें दुर्बोध आणि अर्थशून्य भागाचें प्रमाण फार मोठें आहे. ज्या ग्रंथांचे आधार सदर ग्रंथांत घेतले आहेत ते ग्रंथ अत्यंत सुगम वाटावे आणि त्यांच्या आधारें रचलेला हा ग्रंथ वाचतांना मात्र पदोपदीं अडखळल्यासारखें व्हावें, याचें कारण या ग्रंथाची 'गहनता' असें तर खासच म्हणतां येणार नाहीं ! व म्हणूनच हें विवेचन तर्कदृष्ट्या, भाषादृष्ट्या आणि परिभाषादृष्ट्या शतशः खंडित होण्याचें कारण कोणतें असावें असा प्रश्न अत्यंत सहानुभूतिसंपन्न वाचकालाहि त्रस्त करून सोडल्यावाचून राहात नाहीं.

साधा 'विषय' हा शब्द घ्या. तो सामान्यतः इंग्रजींतील Subject या शब्दाचा वाचक असला, तरी योग्य संदर्भांत योग्य प्रस्तावनेनंतर, Object या अर्थीं वापरल्यास गोंधळ उडण्याचे कारण नसावें. पण ग्रंथकारांनी पृ. ६८ वरील बाराव्या कलमांत, 'विषय' हा शब्द यांपैकीं कोणत्या अर्थानें वापरला आहे याचा बोध पुनःपुनः वाचूनहि होत नाहीं !

भाषाशुद्धीच्या कारकीर्दींत जे कित्येक शब्द वर्तमानपत्रांनीं भोंगळपणें रूढ केले त्यांचा संपर्क अशा शास्त्रीय ग्रंथांस तरी होऊं नये. "स्थगित" हा शब्द सुमारें दहा वर्षांपूर्वीं मराठी लेखनांत अस्तित्वांतच नव्हता, असें म्हणतां येईल. त्यानंतर तो 'तहकूब' या अर्थीं भाषाशुद्धीखातर चालू करण्यांत आला. या ग्रंथांत त्याचे पुढील उपयोग आढळतात. "... अडथळे येतील पण त्यामुळें ती **खच्ची होईल** किंवा **स्थगित होईल**, असें मात्र नाहीं. ...." पृ. ६६.

" केवळ विद्वत्तेमुळें **वाचकांना स्थगित** करण्याची उत्कंठा " २१२ " केवळ सांकेतिक अतएव शास्त्रीय टीकापद्धतीनें निर्माण केलेलें **वाङ्मयाचे स्थगित व शिलावस्थेचें कवच** फोडून टाकण्यास ......" पृ. १५८.

यांपैकीं पाहिला उपयोगहि आम्ही गौण समजतो; आणि दुसरा तर दैनिक वृत्तपत्रांखेरीज कोणी करूं धजेलसें कोणालाहि वाटलें नसतें. पण तो आज एका शास्त्रीय ग्रंथांत पहावयास सांपडत आहे ! आणि तिसऱ्या उपयोगाचा तर बोधच होत नाहीं. अशा शिथिल आणि असम्मत शब्दप्रयोगांनीं भाषा आणि वाचकच अखेर "स्थगित" आणि "खच्ची" होण्याचा संभव अधिक, असें विनोदानें म्हणावेसें वाटल्यास आश्चर्य नाहीं !

या ग्रंथकाराच्या कित्येक शब्दांवरून त्यास इंग्रजींतील कांहीं कांहीं कल्पना व्यक्त करावयाच्या आहेत एवढेंच कळतें; पण त्या कल्पना कोणत्या याचा मात्र बोध होत नाहीं. पान १३, १४ वरील विवेचनांतील 'अनुभविक' हा शब्द पहा. "मनाला न कळत देणारे अनुभव खरे झाले असले, पण अनुभविकाला ते स्पष्ट शब्दांत व्यक्त करतां आले नाहींत तर त्यांचें महत्त्व कमी होत नाहीं." (पृ. १३) या विधानांतील "अनुभविक" हा शब्द व त्याचा प्रयोग बरोबर आहे असें वाटत नाहीं. शिवाय या शब्दाचा विशेषण म्हणून मराठींत निराळ्याच अर्थाचा उपयोग असल्यानें तर अधिकच गोंधळ उडतो. या दुर्बोध आणि संदिग्ध परिच्छेदाचा शेवट पुढील विचित्र विधानानें झाला आहे.

" आणि मागच्यास ठेंच पुढचा शहाणा, या न्यायानें **टीकेच्या शाब्दिक मानस शास्त्रीय पध्दतींत** अधिकाधिक-विकास होईल."

टीकेची 'शाब्दिक मानसशास्त्रीय पध्दति' या शब्दांनीं कोणास काय बोध होईल तो होवो !

इंग्रजी ग्रंथांतील अवतरणांसंबंधींही बराच अव्यवस्थितपणा झाला आहे. कुठें ग्रंथकाराचें नांव नाहीं, तर कुठें ग्रंथाचें नांव नाहीं, तर कुठें दोन्ही असून * भाषान्तर विपर्यस्त स्वरूपांत दिलेलें, असा प्रकार आढळतो.

"The critic of poetry must be himself a poet."

असे बेन जॉन्सन्‌चे उद्‌गार उध्दृत करुन ग्रंथकारानें शेजारींच त्याचें भाषांतर " काव्याचा टीकाकार हा कवि असतो " असें केलें आहे, तें सदोष आहे.

पृ. ३० वरील अवतरणांतील पहिलेंच वाक्य-" प्रवृत्तींत प्रेरणा निर्माण झाली म्हणजे संवेदना निर्माण होतात " असें आहे. मूळ इंग्रजी विधान शेजारीं छापल्याखेरीज या वाक्यावरून कोणाला कांहीं बोध होईलसें वाटत नाहीं. नवी परिभाषा केवळ ठरवून अगर कोशांत छापून आज भागणार नाहीं. तर ती प्रथम योजणारांनीं अशा प्रकारें योजिली पाहिजे कीं संदर्भावरून तिचा अर्थ स्पष्ट व्हावा. तें शक्य नसल्यास, ' कंसांत इंग्रजी पर्याय देण्यानें भाषा बाटते ' ही कल्पना तरी सोडून दिली पाहिजे.

तुटक दोषांची यादी देणें हा आमचा हेतू नाहीं; आणि तसें करायचें म्हटल्यास ती यादी या ग्रंथाइतकीच मोठी होईल. पण हा ग्रंथ वाचतांना अर्थापेक्षां ठेचाच अधिक कां लागतात हा प्रश्न प्रत्येक वाचकालाच त्रस्त करील; आणि त्या प्रश्नाचें उत्तर देण्याचा प्रयत्न हाच या त्रोटक दोषनिर्देशांतील हेतु आहे.

सदर ग्रंथ ' नॅशनल पब्लिकेशन लिमिटेड ' या मुंबई येथील मोठ्या प्रकाशन-संस्थेनें प्रकाशित केला आहे. ग्रंथाची निवड करण्याकरितां सुविद्य आणि भरपूर वेतनाचे नोकर ठेवणाऱ्या संस्थेनें निवडलेला आणि प्रकाशिलेला व मुंबई विद्यापीठासारख्या प्रतिष्ठित विद्यापीठाच्या विद्याभिमानी व परंपराभिमानी विद्वन्मंडळानें मान्य ठरवलेला हा ग्रंथ, इतका

---

* पृ० ४६३ वर इंग्लिश कवि पोप, हा पारंपरिक टीका-पद्धतीवर भर देणारा होता, असें सांगून लेखकानें " **एसेज् ऑफ् क्रिटिसिझम्** " ( ! ) या पोपच्या पुस्तकावर टीकाहि केली आहे. हा उल्लेख " Essay on Criticism " या साहित्य-विषयक काव्यग्रंथाचा आहे हें उघडच आहे. लेखकानें उध्दृत केलेलें नांव केवळ चुकीचेंच नव्हे तर अर्थशून्यहि आहे. त्याच पानावर सुप्रसिद्ध फ्रेंच टीकाकार Boileau याचा निर्देश ' बॉयूलिओ ' असा केला आहे.

दिला आणि निःसत्व असावा याचें कोणासही सखेद आश्चर्य वाटेल. व्यक्तिशः डॉ. पाठक यांच्या अंगीं रसज्ञता आहे; चिन्तनशीलता आहे. पण बुद्धीचा आणि तर्कपद्धतीचा कडकपणा ( Rigour ) नाहीं. आणि याच फाजील मार्दवांत त्यांच्या लेखनांतील दोषांचेंही मूळ आहे. पण लेखकाच्या स्वभावदोषाबरोबरच त्याच्या पुरस्कर्त्या संस्थांच्या स्वभावदोषांचाहि विचार मनांत आल्याखेरीज रहात नाहीं. डॉ. पाठकाचे दोष कदाचित कालान्तरानें नाहींसे होतील, किंवा शास्त्रीय लिखाणाच्या क्षेत्रांत न चमकता पाठक हे काव्य, लघुनिबंध, वगैरेंच्या क्षेत्रांत चमकतील. पण असे प्रबंध परीक्षिणाऱ्या आणि प्रकाशित करणाऱ्या संस्थांनीं मात्र यानिमित्तानें आपल्या कार्यपद्धतीचा फेरविचार करणें जरूर आहे.

आज ' पीएच्. डी. ' पदवी करितां लिहिलेले प्रबंध, विशेषतः मराठीच्या ' डॉक्टरेट ' करितां लिहिलेले प्रबंध , अधिकाधिक बाहेर पडत आहेत. बी. ए. अगर एम्. ए. या परीक्षांत वरचा वर्ग मिळाला नसल्यास नोकरीच्या दृष्टीनें आड येणारें वैगुण्य दूर करण्याचा, परीक्षेच्या मानानें कमी अडचणीचा, एक मार्ग याच दृष्टीनें तरुण पदवीधर मंडळी ' प्रबंध '-लेखनाकडे पहात आहेत असे दिसून येईल. नवीन शास्त्रीय उपपत्ति मांडण्याचें कार्य, किंवा नवीन माहिती संशोधिण्याचें कार्य हें केवळ एवढ्या हेतूनें चांगलें होणार नाहीं, हें उघड आहे. ( डॉ. पाठक यांना मात्र असा गौण हेतु प्रेरक होण्याचें कारणच नाहीं. ते एम्. ए. परीक्षेत पहिल्या वर्गात उत्तीर्ण झालेले आहेत, हे येथें मुद्दाम नमूद केलें पाहिजे. )

तरुण अभ्यासकांची ही आकांक्षा असते,तर त्यांच्या विद्वान मार्गदर्शकांची दृष्टि विद्यार्थ्यांना आणि मायभाषेला उत्तेजन देण्याची असते. पण या सर्व मनुष्यस्वभावाला साजेशाच कारणपरंपरेंत, - " उद्यांच्या पदवीपरीक्षांकरितां हे ग्रंथ वाचले जाऊं लागल्यास विद्यार्थ्यांच्या ज्ञानाचा दर्जा काय राहील ?" हाहि विचार विसरून चालणार नाहीं.

पण केवळ सहानुभूतीमुळेंच सदोष ग्रंथांना मान्यता मिळते असें नाहीं. आमच्या आजच्या संपादकांत आणि परीक्षकांत पृष्ठसंख्या आणि आधारग्रंथांची गर्दी यांच्यासंबंधीं एक मूळचीच मेहेरनजर दिसून येते ! डॉ. माधवराव पटवर्धन हे ज्यावेळीं नोकरीच्या क्षेत्रांतील अपमान टाळण्याकरितां म्हणून आपला एक ग्रंथ वाढवून डॉक्टरेटकरितां सादर करण्याच्या विचारांत होते, तेव्हां त्यांनीं सांगितलेला अनुभव या ठिकाणीं आम्हाला आठवतो. त्यांना एका अनुभवी विद्वानांनीं एक व्यवहारीपणाचा म्हणून सल्ला दिला होता. " जर तुम्हाला डॉक्टरेट हवी असेल, तर तुमचा ग्रंथ जास्तींत जास्त जाड होईल अशी खबरदारी घ्या. "

दोषग्रस्त अशीं पांचशें पानें आणि स्वतंत्र विचारांनीं व सूत्रमय विधानांनीं भरलेलीं पन्नासच पानें, यांतील फरक विद्यापीठाच्या विद्वानांना कळत नाहीं, असें नाहीं. पण कळत असूनहि त्यांचा कल गुणांपेक्षां संख्येकडे कां असतो, हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. आपल्याकडील संस्थांतील सर्वच व्यवहार एकट्या व्यक्तीवरील जबाबदारी आणि विरोधकांचे आक्षेप टाळण्याच्या दृष्टीनें चाललेले असतात. संख्येपेक्षां गुणावर, ग्रंथाच्या जाडीपेक्षां स्वतंत्रदृष्टीवर भर द्यावयाचा म्हटल्यास, परीक्षकांना स्वतःवर जबाबदारी घ्यावी लागेल. व एकाद्यानें वैयक्तिक मत्सरानें देखील आक्षेप काढल्यास आपल्या मताचें समर्थन करीत बसावें लागेल ! त्यापेक्षां पांचशें पानें आणि शंभर ग्रंथांतील उतारे असले कीं निदान उमेदवारानें ' अभ्यास ' केला आहे, ' परिश्रम केले आहेत, ' एवढें तरी निश्चित म्हणतां येतें ! व विरोधकांची भीति उरत नाहीं !

लोकशाहीच्या काळांत विरोध-दमनार्थ हें सर्व ठीक आहे. तथापि प्रबंधपरीक्षणाच्या दृष्टीनें ही वृत्ति खरोखरच घातुक आहे. राधामाधवविलासचंपूची प्रस्तावना विद्यापीठाकडे गेल्यास, लांबी कमी आहे म्हणून त्या ग्रंथाची किम्मत शहाजी–शिवाजींच्या काळाच्या एकाद्या पाल्हाळिक इतिहासापेक्षां कमी ठरवणें योग्य होईल काय ?

मॅथ्यू अर्नोल्ड याचे टीकात्मक निबंध हे स्फुट निबंधाच्या स्वरूपांत आहेत; तो एकसलग आणि 'साधार' ( Documented ) ग्रंथ नाहीं, म्हणून त्याची योग्यता मामुली पदवीधरानें गोळा केलेल्या आणि ग्रंथांत भरलेल्या, 'साधार' माहितीहून कमी होईल काय ?

स्वतंत्र विचार आणि सुसंगत, विचारप्रवर्तक मांडणी हे गुण असल्यानंतरच पानांच्या संख्येला किंमत आहे. आज परीक्षांच्या क्षेत्रांत काय कीं प्रकाशनाच्या क्षेत्रांत काय; आक्षेपकांच्या भीतीनें असो कीं अज्ञानामुळें असो प्रकार उलटा होत आहे. ही स्थिति सुधारण्याचें कार्य या परीक्षांकरीतां नेमलेल्या मार्गदर्शकांनीं ( Coaches ) आणि परीक्षकांनीं केलें नाहीं , तर मराठी पीएच्. डी.चे प्रबंध लवकरच हास्याचा विषय होतील अशी भीति वाटते. आजच तत्त्वज्ञान, इतिहास, पदार्थ–विज्ञान या क्षेत्रांतील ( मुंबई विद्यापीठाकडेच धाडलेल्या ) इंग्रजी ग्रंथांत जितकी तर्कशुद्धता आणि स्वतंत्र दृष्टि दिसते तितकी मराठी ग्रंथांत दिसून येत नाहीं. जोधपूर कॉलेजमधील डॉ. दाते यांचा " Yoga of the Saints " हा प्रबंध जवळजवळ जुन्या मराठी कवींसंबंधींच आहे. पण त्याचा दर्जा त्याच विषयांवर मराठींत झालेल्या पुष्कळशा विद्यालयीन लिखाणाहून फारच वरचा आहे. प्रो. ग. ह. रानडे यांचें Physics and Æsthetics of Hindustani Music हें पुस्तकही सुबोधता आणि पाल्हाळाचा अभाव या दृष्टीनें नमुनेदार आहे.

पण असे ग्रंथ मराठींत निर्माण होण्यास— किंवा जे आधींच झालेले असतील ते मान्यता पावण्यास !— आमच्या परीक्षकांची, संपादकांची आणि प्रकाशकांची, दृष्टि पृष्ठसंख्येपेक्षा व आधारसंख्येपेक्षा स्वतंत्र बुद्धि आणि तर्कशुद्ध मांडणी यांकडे अधिक हवी.

विद्यापीठांचे अभिमानी विद्वान् पीठबाह्य ग्रंथकारांच्या ग्रंथरचनेसंबधीं साशंक वृत्ति दाखवतात; व तशी वृत्ति दाखवतांना बाह्य विद्वानांचे ग्रंथ 'विद्यापीठाच्या कडक कसोटीवर घासलेले नसतात' हे कारण सांगतात. अर्थात् हा अभिमान व ही दृष्टि योग्यच आहे. पण प्रस्तुत सारख्या पदवी–प्रबंधाचीच परंपरा असल्यास, विद्यापीठांना आपला अभिमान सार्थ आहे असे म्हणतां येईलसें वाटत नाहीं.

"जें काय नांव घेण्यासारखे टीकावाङ्मय लिहिलें गेलें आहे तें पीठबाह्य विद्वानांनींच लिहलें आहे" असें एका अमेरिकन टीकाकारानें अमेरिकन टीकावाङ्मयासंबंधीं लिहलें आहे.

हें त्याचें मत खरें असो, अगर खोटें असो; विद्यापीठांना आपला अभिमान टिकवावयाचा असल्यास प्रबंध–परीक्षा आणि प्रबंधलेखन यां संबंधींची दृष्टि बदलणें जरूर आहे.

---

# वैतालीय विचार : श्री. खासगीवाले यांचे लेखास रा. फफे यांचें उत्तर

श्री. खासगीवाले ह्यांनीं आगस्ट १९४७ च्या सह्याद्रींत दिलेल्या वैतालीयाचे लक्षणांत अतिव्याप्ति व अव्याप्ति असल्याचा उल्लेख मी सप्टेंबर १९४७ च्या महाराष्ट्र साहित्यपत्रिकेंत केला होता. त्याचा विचार करण्यासाठीं म्हणून श्री. खासगीवाले यांनीं युगवाणीच्या गेल्या जानेवारीचे व फेब्रुवारीचे अंकांत विस्तृत लेख लिहिला आहे. पण वैतालीयाचें त्यांचें तें आक्षिप्त लक्षण मात्र त्यांनीं या लेखांत दिलें नाहीं ही मोठीच उणीव राहिली आहे. माझ्या अक्षेपांत कांहीं अर्थ आहे कीं नाहीं हें वाचकांस पडताळून पाहतां येण्यास त्यांच्या दृष्टीसमोर तें लक्षण असणें अवश्य आहे म्हणून तें येथें देत आहें. सह्याद्रींतील त्यांचें तें लक्षण पुढीलप्रमाणें आहे:—

वैतालीय–विषमपाद = जव्यतिरिक्त दोन चगण + ज + ध.

वैतालीय–समपाद = जव्यतिरिक्त चगण + भ किंवा ग गण + ई + ई + ध.

[ न = चतुर्लघु. ई = गुरुलघु. ध = गुरु. ]

या लक्षणाप्रमाणें विषमपादाची लगावली पुढील आठ प्रकारचीही संभवते:

( १ ) SSS।।।S।S ( २ ) SS।।।।S।S ( ३ ) S।।S।।।S।S ( ४ ) S।।।।।।S।S

( ५ ) ।।SS।।।S।S ( ६ ) ।।S।।।।S।S ( ७ ) ।।।।S।।।S।S ( ८ ) ।।।।।।।।S।S

पिंगलाच्या लक्षणाप्रमाणें वैतालीय–विषमपादाचे अंतीं रलग यावेच लागतात. वरील आठही प्रकारांत ते न येतां न र गण येतात. म्हणून या लक्षणांत अष्टविध अतिव्याप्ति होते. तसेच समपादाचे लक्षणांत ( १ ) ।।।।।।।।S।S।S. ( २ ) S।।।।।।S।S।S ह्या दोन प्रकारांचाही समावेश होतो. यांतील क्रमवार सहा लघु पिंगलोक्त लक्षणाप्रमाणें अग्राह्य असल्यामुळें यांतही अतिव्याप्ति होते. अशाप्रकारें श्री. खासगीवाले यांच्या त्या सह्याद्रींतील वैतालीयलक्षणांत दशविध अतिव्याप्ति होते. वाचकांनीं हें ध्यानीं घ्यावें कीं, माझा हा आक्षेप आगस्ट १९४७ च्या सह्याद्रींतील लक्षणावर घेतलेला आहे, जानेवारी १९४९ च्या युगवाणींतील लक्षणावर नव्हे, म्हणजे गैरसमज राहाणार नाहीं.

आतां श्री. खासगीवाले यांच्या युगवाणींतील नव्या लक्षणाकडे वळावयाचें, पण तत्पूर्वीं थोडें कटुकर्तव्य करणें प्राप्त आहे. 'दुसऱ्याचे गळ्यांत घोरपड अडकवणें,' 'पळवाट काढणें' असले हीन हेतूचा आरोप करणारे शब्द त्यांनीं योजिले आहेत. असले शब्दप्रयोग मजपुरतेच मर्यादित असते तर मी त्यांचा निषेध केलाहि नसता; पण त्यांनीं वृत्तरत्नाकरकर्त्या केदारभट्टावरही बुद्धया दुष्टपीपणा केल्याचा, आणि तोही मिथ्या, दोषारोप केला आहे. माझ्या लेखांतील चुका शतशः दाखविण्यास माझी हरकत नाहीं. चुका सुधारीतच सत्याकडे जातां येतें. पण केदारभट्टासारख्या विख्यात ग्रंथकारासंबंधें लिहितांना शब्द जरा जपून योजावयास हवेत. दुसऱ्या ग्रंथकाराचें म्हणणें पटत नसलें तर 'इति चिन्त्यम्', 'इति मृग्यम्' असें म्हणण्याची शिष्टांची रीति आहे. 'इति प्रामादिकम्' असेंहि ते सहसा म्हणत नाहींत. तथापि 'येथें केदारभट्ट चुकला' असें म्हणणें एकवेळ क्षम्य मानितां येईल; पण बुद्धया दुष्टपीपणा केल्याचा आरोप त्याजवर करणें शिष्टत्वास सोडून होईल हें नम्रपणें श्री. खासगीवाले यांच्या निदर्शनास आणणें भाग आहे. आपल्या मताच्या सिध्दतेस असल्या शब्दप्रयोगांचा कांहीं उपयोगहि नसतो, त्यांनीं व्यर्थ कटुता मात्र निर्माण होते. उदाहरणार्थ,

श्री. खासगीवाले यांनीं आपल्या सह्याद्रींतील वैतालीय लक्षणांतल्या कांहीं अटी बदलून, व कांहीं अटी अगदीं नव्या घालून आतां त्यांत आमूलाग्र बदल केला आहे. पण हा बदल व ही पुस्ती ह्यांस " करावयाचा राहून गेलेला **थोडा खुलासा** " असें त्यांनीं युगवाणींत म्हटलें आहे ! मूळ अटींतील बदल व नवीन अटींची भर म्हणजे कांहीं खुलासा नव्हे; खुलासा म्हणजे मूळच्याच अटींचें केवळ स्पष्टीकरण. आतां " श्री. खासगीवाले हे येथें **थोडा खुलासा** असे शब्द योजून चुकी कबूल करण्याची टाळाटाळ करीत आहेत " असें कोणी म्हटल्यास, तें खरें असलें तरी त्यास रुचेल का, हे त्यांनींच पहावें. मला वाटतें असल्या शास्त्रीय विषयाच्या चर्चेंत सत्याजिज्ञासा एवढाच उद्देश असावा; चुकलें काय तें स्पष्ट सांगावें, पण त्यापलीकडे जाऊन हीनहेतुत्वाचे आरोप करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. असो.

श्री. खासगीवाले ह्यांच्या सह्याद्रींतील वैतालीय-लक्षणांत दशविध अतिव्याप्ति होती, ती आतां ह्या युगवाणींतील लक्षणांत राहिलेली नाहीं. तथापि त्यांत अव्याप्ति राहिली आहे कीं नाहीं हें मात्र पाहिलें पाहिजे. या लक्षणांत हेमचंद्राच्या मतानुसार सप्तविध अव्याप्ति कोणती होते हें श्री. खासगीवाले यांनीं स्वतःही दाखविलें आहेच. पण येथें हेमचंद्र चुकला आहे, आणि पिंगलाच्या सूत्रांप्रमाणें आपल्या लक्षणांत अव्याप्तिदोष येत नाहीं, असें त्यांनीं प्रतिपादिलें आहे. येथील विचाराचा मुख्य विषय असा आहे कीं, पिंगलसूत्रांनुसार वैतालीय-समपादांत सातवी व आठवी या मात्रा लघुरूपच असल्या पाहिजेत, त्यां मिळून गुरु अक्षर होतांच कामा नये, असें श्री. खासगीवाले म्हणतात आणि या स्थलीं गुरु अक्षर चालतें असें हेमचंद्रानें मानिलें आहे. हेमचंद्रानेंच नव्हे, तर हलायुधापासून शिंत्रे शास्त्री यांपर्यंत आजवर झालेल्या कोणाही टीकाकारानें वा छंदोग्रंथकारानें वैतालीय-समपादांत सातवी-आठवी मात्रा मिळून होणारा गुरु निषिद्ध म्हटला नाहीं. श्री. खासगीवाले हेंच तसें प्रथम म्हणत आहेत आणि विशेष हें कीं, हेमचंद्रादिक सर्वांचें मत आपल्या विरुद्ध आहे हें स्वतः नमूद करून ते आपलें भिन्न मत प्रतिपादीत आहेत व तें पिंगलसूत्रांनुसार आहे असें म्हणत आहेत. हलायुधाचे वेळींहि हीं पिंगलसूत्रें कशीं दुर्बोध भासत होतीं हें हलायुधानें आपल्या टीकेस **मृतसंजीवनी** असें नांव देऊन उत्तम व्यक्त केलें आहे. जणूं काय मृत झालेल्या ह्या सूत्रांस आपण आपल्या टीकारूपी संजीविनी मात्रेनें पुनरुज्जीवित केलें असेंच त्यानें हें नांव देऊन दर्शविलें आहे. अशा ह्या दुर्बोध भासणाऱ्या पिंगलसूत्रांचा अर्थ करण्यांत हेमचंद्रादिक चुकले नसतीलच असें कांहीं गृहीत धरतां येणार नाहीं. जुन्या ग्रंथकारांनीं स्वीकारलेला अर्थ म्हणूनच तो खरा, असें कांहीं म्हणतां यावयाचें नाहीं. पिंगलसूत्रांतून सरळपणें निघेल तोच अर्थ खरा होय. मग तो प्राचीनांनीं दिलेला असो, वा नवीनांनीं दाखविलेला असो. प्रस्तुत वैतालीय-समपादांत सप्तम-अष्टम मात्रांच्या गुरूचा निषेध पिंगलाच्या सूत्रांतून निघतो असें ठरलें तर, आजवर कोणासही न लागलेला हा नवीन शोध लावण्याचा मान श्री. खासगीवाले यांस प्राप्त होईल यांत संशय नाहीं. मात्र तो निषेध पिंगलसूत्रांतून निघाला पाहिजे. तसा तो निघतो कीं काय हें आतां पहावयाचें आहे.

वैतालीयांतील **रलग** म्हणजे ऽ।ऽ।ऽ ह्या निश्चित स्वरूपाच्या अन्त्य भागामागील **शेष** भाग विषम पादांत सहा मात्रांचा व समपादांत आठ मात्रांचा राहतो. त्यांत सममात्रा व तीपुढील मात्रा मिळून होणारीं गुरु अक्षरें येऊं नयेत असा निषेध **शेषे परेण युङ् न साकम्** या सूत्रानें पिंगलानें सांगितला आहे. हे गुरु निषेधिल्यानंतर समपादांतील शेषांत

विषम-सम-मात्राघटित म्हणजे पहिली-दुसरी, तिसरी-चौथी, पांचवी-सहावी आणि सातवी-आठवी या मात्रा मिळून होणारीं चार गुरु अक्षरें किंवा त्यांपैकीं एका वा अनेकाऐवजीं लघूंची जोडी, अशींच अक्षरें येण्याचा संभव राहतो. म्हणजे हे एवढेच प्रकार आतां येथें प्रसक्त आहेत आणि यांच्याचविषयीं कांहींतरी पिंगलानें **षट् चामिश्रा युजि** या सूत्रांत सांगितलें आहे. हें त्यानें काय सांगितलें आहे तेंच आपणास शोधावयाचें आहे.

पिंगलानें ह्या सूत्रांत सातव्या-आठव्या मात्रेचा गुरु निषेधिला आहे असें श्री. खासगीवाले यांचें म्हणणें आहे. हा निषेध प्रत्यक्ष केलेला नाहीं हें त्यांस मान्य आहेच. पण तो निषेध **प्रसक्तस्यैव निषेधः** या न्यायशास्त्रीय वचनानुसार या सूत्रांतून निघतो असें त्यांचें म्हणणें आहे. येथें मी नम्रपणें त्यांच्या निदर्शनास आणूं इच्छितों कीं, **या न्यायशास्त्रीय वचनाची येथें प्रसक्तिच नाहीं.** सांगितलेल्या एका गोष्टीवरून दुसऱ्या कशाचें अनुमान होतें, याशीं या वचनाचा अर्थाअर्थी काहीं संबंध नाहीं. तें प्रकरण निराळें, आणि हें प्रकरण निराळें. प्रत्युत **प्रसक्तस्यैव निषेधः। नतु अप्रसक्तस्य** ! या वचनाची **प्रसक्ति** म्हणजे प्राप्ति कोठें होते हें स्पष्ट होण्यासाठीं एक उदाहरण घेऊं. समजा, ज्या शाळेंत फक्त मुलगेच आहेत, मुली नाहींत, अशा मुलांच्या शाळेच्या नोटीसबोर्डावर "या शाळेस उद्यां मंगळागौरीची सुटी नाहीं" अशी नोटीस फडकलेली दिसली तर ? नोटीस वाचणारीं लहान मुलें देखील म्हणतील कीं, ही नोटीस कशाला लाविली ! उद्यां सुटी असेल अशी कल्पना तरी कोणी केली होती ! म्हणजे ज्याचा प्रत्यक्ष निषेध करावयाचा,त्याची तेथें आधी **प्रसक्ति** म्हणजे प्राप्ति असावयास हवीच. प्रसक्ति नसतां केलेला निषेध हास्यास्पद होईल हाच वरील वचनाचा आशय होय. एकावरून दुसऱ्या कशाचें अनुमान होतें याशीं ह्या वचनाचा कांहीं संबंध नाहीं. असो. येथें सप्तमाष्टम मात्रांचा गुरु प्रसक्त असतांही पिंगलानें त्याचा निषेध केला नाहीं, त्यापक्षीं तो त्यास निषिद्ध वाटत नाहीं, असेंच सरळ-पणानें प्राप्त होतें.

श्री. खासगीवाले यांनीं **षट् चामिश्रा युजि** या सूत्रांतून पुढील तीन नियम काढिले आहेत.

(१) समपादांतील पहिल्या सहा मात्रा गुरु किंवा लघुगुरुमिश्रित असाव्या.

(२) सातवी व आठवी या मात्रा लघु असाव्या.

(३) आठ मात्रांत ओळीनें सहा लघुमात्रा नसाव्या.

या सूत्रांत षट् म्हणजे सहा आणि युजि म्हणजे समपादांत हे अर्थ स्पष्ट असून त्या-विषयीं मतभेद नाहीं. मतभेदाचे प्रश्न पुढील दोनच आहेत.

(१) मागील सूत्रांतून नकाराची अनुवृत्ति घेतां येतें कीं नाहीं हा एक प्रश्न. याचा निर्णय विवेचनपूर्वक करावा लागेल तो पुढें करूं. तूर्त श्री. खासगीवाले यांच्या म्हणण्या-प्रमाणें नकाराची अनुवृत्ति घेऊन काय ठरतें तें प्रथम पाहूं.

(२) **मिश्र** म्हणजे काय हा दुसरा प्रश्न. मिश्र म्हणजे लघुगुरूंची सरमिसळ, असें मिश्रणाच्या व्यावहारिक अर्थानें साहजिकच वाटतें. मीहि तसेंच समजून ह्या सूत्राची संगति जमवूं पहात होतों. वैतालीयाचें मी दिलेलें लक्षण निर्विवाद असलें तरी मिश्र ह्या पारिभाषिक शब्दाचा पिंगलाचा अर्थ निराळा असून तो घेतल्यानें त्याचे सूत्रांतून हें लक्षण अगदी सरळ-पणें निघतें, हें पुढें माझ्या ध्यानीं आलें. मिश्र हा पिंगलाचा पारिभाषिक शब्द आहे कीं नाहीं व असल्यास त्याचा पिंगलोक्त अर्थ काय आहे, ह्या प्रश्नाचें सविस्तर विवेचन पुढें

करावयाचें आहेच. तूर्त श्री. खासगीवाले यांनीं घेतलेल्या अर्थाप्रमाणें तरी त्यांचे हे तीन नियम ह्या सूत्रांतून सुसंगतपणें निघतात कीं कसें हें प्रथम पाहूं आणि तदनंतर वरील दोन्ही मतभेदाच्या प्रश्नांचा ऊहापोह करून सूत्रार्थाचा निश्चय करूं.

(१) वरील पहिल्या नियमांत **पट्** म्हणजे **पहिल्या सहा मात्रा** असा अर्थ श्री. खासगीवाले करितात. पण त्या **पहिल्याच** असें म्हणावयास सूत्रांत काय आधार आहे? तेथें नुसता पट् असा शब्द आहे. त्यानें पहिल्या दोन सोडून पुढल्याहि सहा दर्शविल्या जातील. त्या **पहिल्याच** असें मानणें निराधार होय.

(२) मिश्र शब्दाचे दोन अर्थ ते घेतात. लघुगुरुमिश्रित म्हणजेहि मिश्रच आणि केवल गुरु म्हणजेहि मिश्रच. मिश्र शब्दाचा असा दुहेरी अर्थ घेण्यास पिंगलसूत्रांत काय आधार आहे? व्यावहारिक अर्थ घ्यावा तर मिश्रणांत भिन्न जातींची सरमिसळ हवीच. ऽ ऽ ऽ ह्या एकजात गुरुंस व्यावहारिक अर्थानें मिश्र म्हणतां येणार नाहीं.

(३) श्री. खासगीवाले यांच्या कल्पनेप्रमाणें 'पहिल्या सहा मात्रा लघु नसाव्या' असा अर्थ घेतला तरी त्यावरून पुढल्या दोन लघु असल्याच पाहिजेत असें अनुमान कसें निघेल? त्या लघु असल्या तरी चालतील इतकेंच निघेल. सोमवारीं कांदा खाऊं नये ह्या निषेधांतून इतर वारीं तो खाल्लाच पाहिजे असा विधि कसा निघेल? केलेला निषेध सोमवारापुरताच आहे; इतर वारीं खाणें न खाणें ज्याच्या त्याच्या इच्छेवर आहे. तद्वत् 'पहिल्या सहा मात्रा लघु नसाव्या' असा निषेध केला असला तर तोहि त्या सहा मात्रांपुरताच मर्यादित होणार. सातवी व आठवी इच्छेनुरूप घेतां येईल. त्या लघुच पाहिजेत असें ह्या निषेधांतून निघत नाहीं.

(४) तथापि क्षणभर पट् म्हणजे पहिल्याच सहा, केवळ गुरु म्हणजेहि मिश्रच, वगैरे सर्व गृहीत धरल्यावर तरी काय निष्पन्न होतें तें पाहूं. गुरुंपुढें लघु किंवा लघूंपुढें गुरु येऊन होणारे ऽऽ।।, ।।ऽऽ व ।।।।ऽ हे प्रकार जर मिश्र म्हणावयाचे, तर त्याच न्यायानें ऽ।।।। हा प्रकारहि मिश्रच ठरतो. अर्थात् तो समपादांत प्रारंभीं येऊं शकतो हे मान्य करणें अपरिहार्य होतें.

(५) आतां ऽ।।।। ह्या स्वरूपाच्या सहा मात्रांपुढें श्री. खासगीवाले यांच्या दुसऱ्या नियमाप्रमाणें दोन लघु जोडले कीं, ऽ।।।।।। अशा आठ मात्रा सिद्ध होतात व त्या समपादांत प्रारंभीं येऊं शकतात असेंच मानणें प्राप्त होतें. पण अशा स्वरूपाच्या आठ मात्रा येऊं नयेत असें त्यांचा तिसरा नियम सांगत आहे त्याशीं याचा विरोध येतो. तेव्हां ह्या नियमांची संगति कशी लागावयाची?

येथवर आपण पाहिलें कीं, नकाराची अनुवृत्ति घेऊन आणि पट् म्हणजे पहिल्याच सहा, एकजात गुरु म्हणजेहि मिश्रच इत्यादि सर्व गृहीत धरून श्री. खासगीवाले यांनीं ठरविलेले नियम परस्परांशी सुसंगत होत नाहींत. तसेंच सप्तमाष्टम मात्रांचा गुरु प्रसक्त असतांहि पिंगलानें त्याचा निषेध केला नसल्यानें तो त्यास संमत ठरतो आणि म्हणूनच हा गुरु निषिद्ध मानून केलेल्या श्री. खासगीवाले यांच्या वैतालीय लक्षणांत सप्तविध अव्याप्ति आहे असें ठरतें.

एवढें पाहिल्यानंतर आतां **मिश्र** या शब्दाचा पिंगलाचा अर्थ काय आहे आणि **पट्चामिश्रा युजि** या सूत्रांत मागील नकाराची अनुवृत्ति घेतां येते कीं काय, या विशेष महत्वाच्या दोन प्रश्नांचा विचार करावयाचा आहे. माझ्या समजुतीप्रमाणें हे दोन प्रश्न अशा

अनुक्रमणिका

प्रकारें येथें प्रथमच विवेचिले जात आहेत. वास्तव या विवेचनाचें परीक्षण विद्वज्जनांनीं सूक्ष्मदृष्टीनें करावें, आणि त्यांत कांहीं न्यूनाधिक्य असलें तर तें अवश्य दाखवावें अशी माझी त्यांस विनंती आहे.

मिश्र हा पिंगलाचा पारिभाषिक, विशिष्टार्थक शब्द असून तो त्यानें आणखी दोन सूत्रांत योजिला आहे.

**मिश्रौच (८-३२). पृथग्ला मिश्राः । (८-२२)**

येथील मिश्र शब्दाचा अर्थ हलायुधानें पुढील प्रमाणें सांगितला आहे :—

**गकारो गकारेण संश्लिष्टो मिश्र उच्यते । लकारश्च लकारेण ।**

संश्लिष्ट म्हणजे जवळजवळ आलेले **केवल गुरु म्हणजे मिश्र गुरु**, तसेंच क्रमानें आलेले **केवल लघु** म्हणजे **मिश्र लघु**, हा हलायुधानें दिलेला अर्थच या दोन सूत्रांत घ्यावा लागतो. म्हणून येथील मिश्र शब्दाचा पिंगलाचा अर्थ तोच होय. या दोन्ही सूत्रांत लघुगुरूंची सरमिसळ करतांच येत नाहीं. म्हणून **मिश्र म्हणजे लघुगुरुमिश्रित असा पिंगलाचा अर्थ नाहीं. मिश्रौच** या सूत्राचे मांडणींत **मिश्रौ** या द्विवचनाप्रमाणें प्रथम दोन गुरु व त्यानंतर दोन लघु मांडावे लागतात. तसेंच **पृथग्ला मिश्राः** या सूत्राचे मांडणींत **मिश्राः** या बहुवचनाप्रमाणें चार, आठ, सोळा इ० गुरु क्रमाने मांडून त्यापुढें तितकेच क्रमानें लघु मांडावे लागतात, सरमिसळ चालत नाहीं. अर्थात **मिश्र** हा पिंगलाचा विशिष्टार्थक पारिभाषिक शब्द असून त्याचा पिंगलोक्त व हलायुधानें संजीविनीमात्रेनें पुनरुज्जीवित केलेला अर्थ ,

**मिश्रगुरु=क्रमवार केवल गुरु; मिश्र लघु=क्रमवार केवल लघु'**

हा अशाप्रकारचा आहे. मिश्र शब्दाचा सजीव झालेला हा अर्थ आतां पुन्हा मृत होऊं न देतां, म्हणजे तो न विसरतां पट् चामिश्रा युजि ह्या सूत्राकडे आतां वळावयाचें आहे. एकाच शास्त्रग्रंथांत कोणताही पारिभाषिक शब्द सर्वत्र समान अर्थानेंच योजिला पाहिजे, असा शास्त्रकारांचा दंडक आहे. पिंगलासारखा श्रेष्ठ प्रतीचा शास्त्रकार हा दंडक कसा मोडील ? त्यानें **पट् चामिश्रा युजि** या सूत्रांतही **मिश्र** हा शब्द वर दिलेल्या अर्थानेंच योजिला असला पाहिजे हें मान्य करण्याविना गत्यन्तर नाहीं. तेव्हा त्या सूत्रांतील **पट्मिश्र** म्हणजे **क्रमानें सहा गुरु** किंवा **क्रमाने सहा लघु** या दोन पर्यायांपैकींच असणार हें निर्विवाद होय. आठ मात्रांत सहा गुरु येऊंच शकत नाहींत म्हणून येथें क्रमानें सहा गुरु हा पर्याय बाधित होतो आणि क्रमानें सहा लघु हा एकच पर्याय उरतो. अशाप्रकारें **पट् चामिश्रा युजि** ह्या सूत्रात **पट्-मिश्र** म्हणजे **सहा क्रमानें लघु** हा अर्थ निश्चित होतो.

वैतालीय-समपादांतील पहिल्या आठ मात्रांत क्रमवार सहा लघु येणें संभवतें. म्हणजे ते प्रसक्त आहेत. ते यावयास नको असतील तर त्यांचा निषेध केला पाहिजे. निषेध केला नाहीं तर त्यांत क्रमानें सहा लघु असावे असा अर्थ ठरेल. येथेंच आतां पूर्व सूत्रांतून नकाराची अनुवृत्ति घ्यावयाची कीं नाहीं हे ठरविण्याची वेळ प्राप्त होते.

नकार अनुवृत्त केला तर तो नकार आणि सूत्रांतील **'अमिश्राः'** या पदांतील अकार यांचा संक्षेप उडून 'पट् अमिश्रा (लकारः) नकर्तव्याः' म्हणजे 'पट् मिश्रा लकाराः कर्तव्याः' असें निष्पन्न होऊन सम पादांतील पहिल्या आठ मात्रांत सहा क्रमानें लघुरूप आणाव्या असा अर्थ ठरेल आणि नकार अनुवृत्त न केला तर "युजि शेषे पट् अमिश्रा लकाराः कर्तव्याः" म्हणजे समपादांतील पहिल्या आठ मात्रा, ज्यांत क्रमानें सहा लघु अक्षरें नाहींत, अशा घ्याव्या असा

अर्थ निष्पन्न होईल. अर्थाचे हे दोनच पर्याय आतां प्रसक्त आहेत. यापैकीं आपणांस कोणता ग्राह्य आहे यावर नकाराची अनुवृत्ति घेणें न घेणें अवलंबून आहे. हलायुधापासून श्री. खासगीवाले यांपर्यंत कोणीही येथें सहा लघु क्रमानें आणावे हा अर्थ ग्राह्य केलेला नाहीं, सर्वांनीच तो त्याज्य ठरविला आहे. तेव्हां एकच पर्याय उरला तो म्हणजे नकाराची अनुवृत्ति न घेतां होणारा " युजि शेषे षट् अमिश्रा लकाराः कर्तव्याः " हाच होय. अशाप्रकारें निश्चित होतें कीं, "षट् चामिश्रा युजि" ह्या सूत्राचा अर्थ, वैतालीय समपादांतील पहिल्या आठ मात्रांत क्रमानें सहा लघु अक्षरें येणार नाहींत अशीच अक्षरयोजना करावी, हाच आणि एवढाच आहे. याहून निराळें किंवा याहून अधिक असें त्यांतून कांहींएक निष्पन्न होत नाहीं.

येथें नकाराची अनुवृत्ति घेतलेली नाहीं; पण 'षट् चामिश्रा युजि' या सूत्रांतील चकारानें तर अनुवृत्ति दर्शित होते याची वाट काय, असा प्रश्न येथें कोणी कदाचित् विचारील, तर त्याचें उत्तर अगदीं सुगम आहे. येथें अनुवृत्ति आहे हें मान्यच आहे, पण ती अनुवृत्ति नकाराची नव्हे. तर पूर्व सूत्रांतील शेषे ह्या पदाची आहे. ती आपण घेतली आहेच, आणि चकाराचा निर्वाह होण्यास ती पुरेशी आहे. स्वतः हलयुधानेंही येथें नकाराची अनुवृत्ति होते असें म्हटलेलें नाहीं व त्यानें ती घेतलेलीहि नाहीं. त्यानें देखील फक्त शेषे ह्या पदाचीच अनुवृत्ति घेतलेली आहे.

वास्तविक प्रतिपाद्य विषयाचें विवेचन येथें संपतें. तथापि टाळाटाळ केली असें म्हणावयास जागा राहूं नये म्हणून आणखी एक गोष्ट येथें नमूद करणें अवश्य वाटतें. ती म्हणजे या सूत्रावरील हलायुधाचे टीकेंत एक अपपाठ आहे ही होय. हस्तलिखितांत हस्तदोषानें अपपाठ येतात; तसेंच खरा अर्थ ध्यानीं न येऊन जावई-शोध केले जातात त्यामुळेंही कांहीं अपपाठ उत्पन्न होतात हें शास्त्रांस माहीत आहेच. ग्रंथकारास वास्तविक काय सांगावयाचें आहे हें निश्चित माहीत असेल तर खरा पाठ ठरविणें सोपें जातें. तसेंच तो पाठ टीकेंतला असेल तर मुळाशीं तुलना करण्यानेंही पाठानिश्चितीचा मार्ग सांपडतो. प्रस्तुत आपणापुढे ' षट् चामिश्रा युजि ' हें सूत्र आणि त्यावरील " अत्र द्विचतुर्थपादयोः षड्लकारा ( ? ) न कर्तव्याः । न पृथक् प्रयोक्तव्याः इत्यर्थः " अशी टीका आहे आणि तींतील प्रश्नचिन्हाचे जागीं कोणता शब्द असेल तें ओळखावयाचें आहे असें समजूं. आपण वर पाहिलेंच आहे कीं,

मिश्र = लघुसंश्लिष्टलघु = पृथक् पृथक् केवल लघु

हा अर्थ स्वतः हलायुधानेंच दिला आहे. ' न पृथक् प्रयोक्तव्याः ' हा इत्यर्थही त्यानें स्वतःच सांगितला आहे. हा इत्यर्थ, मिश्र शब्दाच्या वरील अर्थानुसारें " षट् लकारा मिश्रा न कर्तव्याः " याचाच निघेल; म्हणून प्रश्नचिन्हाचे जागीं मिश्राः असेंच पद असलें पाहिजे. तेथें अमिश्राः असें पद घेतलें आणि नकाराची अनुवृत्ति घेतली तर ' अमिश्रा न कर्तव्याः म्हणजे ' मिश्राः कर्तव्याः ' म्हणजे क्रमानें सहा लघु आणावे, असा विवक्षित अर्थाचे अगदीं उलट अर्थ निष्पन्न होईल. म्हणून येथें हलायुधानें अमिश्रा असें पद योजिलें असणें सर्वथा असंभाव्य होय. अर्थात् हलायुधटीकेंत येथें मिश्राः हाच पाठ ठरतो. तो स्वीकारल्याविना गत्यंतर नाहीं.

पिंगल, हलायुध, हेमचंद्र आणि केदारभट्ट यांची कशी एकवाक्यता आहे हें त्यांनीं योजिलेल्या शब्दांची तुलना केली असतां सुस्पष्ट होतें. पहाः—

| पिंगल | हलायुध | हेमचंद्र | केदारभट्ट |
|---|---|---|---|
| । | । | । | । |
| मिश्र = | लघुसंश्लिष्टलघु = | संतत ल = | निरन्तर ल |

पिंगलानें मिश्र शब्दामागें अकार जोडून निषेध दर्शविला होता. त्याऐवजीं इतर तिघांनीं नकार निराळा घातला आहे इतकेंच. हा नकार 'अमिश्राः' दांतील अकारांतूनच सर्वांनीं घेतला आहे. तो मागील सूत्रांतून अनुवृत्त केलेला नाहीं. असें म्हणावयास चिंता नाहीं कीं, पिंगलसूत्रांस हलायुधानें आणलेली सजीवता केदारभट्टापर्यंत टिकली. मिश्र म्हणजे क्रमवार लघु हा पिंगलाचा अर्थ कालांतरानें विसरला गेला आणि व्यावहारिक अर्थानें मिश्र म्हणजे 'लघुगुरुमिश्रित' असें चुकीनें मानलें जाऊं लागल्यामुळें इष्टार्थाचे सिद्धीसाठीं अनुवृत्त नकार घेण्याची कल्पना निघाली. मिश्र शब्दाचे केवल गुरु, आणि लघु-गुरुमिश्रित असे दोन्ही अर्थ घेण्याची कल्पना मात्र प्रायः श्री. खासगीवाले यांचीच असावी.

**सारांश**

(१) मिश्र ह्या पारिभाषिक शब्दाचा पिंगलोक्त व हलायुधानं पुनरुज्जीवित असा जो अर्थ आहे तोच 'पट्चामिश्रायुजि' ह्या सूत्रांतही घेतला पाहिजे.

(२) नकाराची अनुवृत्ति घेतांच येत नाहीं. घेतल्यास विपरीत अर्थ होतो.

(३) वरील दोन्ही मुद्यांविषयीं हलायुध, हेमचंद्र व केदारभट्ट यांची एकवाक्यता आहे.

(४) वैतालीय समपादाचे पहिल्या आठ मात्रांत क्रमानें सहा लघु अक्षरें नसावीं, एवढाच अर्थ 'पट्चामिश्रायुजि' ह्या सूत्रांतून सरळपणें निघतो.

(५) सप्तम- अष्टम मात्रांच्या गुरुचा निषेध पिंगलानें केलेला नाहीं. आणि म्हणून

(६) हा निषेध गृहीत धरून केलेल्या श्री खासगीवाले यांच्या जानेवारी १९४९ च्या युगवाणींतील वैतालीय-लक्षणांतही सतविध अव्याप्ति आहेच.

६०२, शिवाजीनगर पुणें ४. <br> २४-२-४९. } यशवंत गणेश फफे.

## स्मृतींचीं बीजें : —मनमोहन

झिम् झिम् झिम् या स्वरलहरी
उठल्या लक्षावधि तारांतुनि ॥ धृ. ॥

मनमोराचा उभा पिसारा
संतोषाच्या करि चित्कारा
अलग विलगुनी अधुल्या अधरा
टिपें मोक्तिकें दिलीं दिशांनी ॥१॥

खांबावरल्या तारेवरलें
वाघुळ परवापासुनि मेलें
पंख फडफडूं पुन्हा लागलें
पडले अमृत हें स्वर्गांतुनि ॥२॥

माझ्या रुसलेल्या प्रतिभेनें
आणिक आळसल्या कवितेनें
दिलें मौन सोडून खुशीनें
शब्द चालले अब्ज पदांनीं ॥३॥

अनुभूती ज्या कुजल्या होत्या
त्यांत स्मृतींचीं बीजें पडतां
बाग बनुन ये बघतां बघतां
'वृत्त' हि हो लघु-दीर्घ सोविनीं ॥४॥

# संपादकीय

एकविसाव्या वर्षाचा हा चवथा अंक परिषदेचे सदस्य व वाचक यांच्या हातीं दिल्यावर माझी संपादकीय कारकीर्द समाप्त होण्याचा संभव होता. पण नवीन कार्यकारी मंडळाने ही कामगिरी मजकडेच चालू ठेवण्याचा निर्णय घेतला आहे. माझी कामगिरी कार्यकारी मंडळाने रुजू करून घेतली, असाच मी याचा अर्थ करतों आणि कार्यकारी मंडळाचे आभार मानतों.

मी जेव्हा ही कामगिरी पत्करली तेव्हा मला कांहींसें अवघड वाटत होतें. पण पत्रिकेच्या हितैषींनी व आप्तांनी आपलें साह्य देऊन मला ह्या अवघड वाटचालींत सोबत केली. पत्रिकेकडे सहसा न वळणारे साहित्यिकहि माझ्या विनंतीला मान देऊन आपला सहकार्याचा हात पुढें करते झाले. कै. साधुदास कवि यांनी आपल्या एकंदर साहित्यसेवेबद्दल असे उद्गार काढले आहेत कीः—

सहज उमटणाऱ्या माझिया शब्दजातें
निवति रसिक कीं ना, ठाउकें हें न मातें
मम सगुण पदें मी सज्जनां वाहियेलीं
अगुण मज मुलाला भूषणप्राय झालीं

त्यांच्या ह्या श्लोकांतील भावनेचा अनुवाद करून मीहि मनोभावें म्हणतों की संपादनांत जें चांगुलपण आढळलें असेल तें लेखकांचें आहे, आणि जें न्यून असेल तें माझें आहे. न्यून नाहींसें करण्याच्या कामीं सर्व सहकाऱ्यांनी असाच कृपालोभ ठेवावा.

* * *

पत्रिकेंत अधिक कांही वाङ्मय–प्रकार समाविष्ट करावेत अशी इच्छा होती. पण तिच्या स्वरूपाची परंपरा फारशी विनसूं नये ह्या धोरणाने संपादकाला स्वतःच्या इच्छेला आवर घालावा लागे. शिवाय पत्रिकेची पृष्ठमर्यादाहि फार जाचक होते. तिच्या दोनशें पृष्ठांत सर्व कांही संसार थाटायचा म्हणजे केवढी कुचंबणा ! ह्या संकोचामुळे अनेक गोष्टींत नाइलाज होतो. शिवाय ती तिमाही निघणार. ह्यामुळे बऱ्याच बाबतींत शिळेपणा येतो. पत्रिकेकडे येणाऱ्या नवीन ग्रंथांचा समाचार घेणें हें पत्रिकेचें मुख्य कार्य समजलें जातें. पण त्यालासुद्धां पुरेसा अवसर मिळत नाही. श्री. खांडेकर यांनी केलेलें "केशवसुत"–परीक्षण श्री. मोडक यांचें 'व्युत्पत्ति कोश'–परीक्षण, प्रा. क्षीरसागर यानी केलेलें "टीका आणि टीकाकार"–परीक्षण, अशा तऱ्हेने मौलिक ग्रंथांचा परामर्ष वारंवार घेतां यायला पाहिजे. ग्रंथनिर्मात्यांना तो उपकारक होतो, वाचकाला तो उद्बोधक होतो. शेरा मारल्यासारखे सूत्रमय अभिप्राय फारसे कामीं येत असतील असें वाटत नाही. पण सविस्तर परामर्षाला वाव नसल्यामुळे वारंवार त्रोटक अभिप्रायांवरच निर्वाह करण्याची पाळी येते. आणि त्यांतहि सर्व ग्रंथांचा तत्परतेने समावेश होत नाही.

शुद्ध शास्त्रीय चर्चात्मक वा संशोधनात्मक लेख प्रकाशित करणें हेंहि पत्रिकेचें दुसरें उद्दिष्ट. पण तशा लेखांचें स्वागत करतांना सुद्धा हीच अडचण. ह्या अडचणीपायीं कांही विद्वानांना मला किती कष्टाने नकार द्यावा लागला आहे ! सांप्रत शहरी राहणींत घरचा व अगत्याचा पाहुणासुद्धा जागेच्या टाचगेपणामुळे दारांतूनच परतविण्याचे प्रसंग गृहस्थाश्रमी-

यांवर आले म्हणजे त्याला जें दुःख होतें तशा प्रकारचें दुःख मला वेळोवेळीं झालें आहे. ज्या ज्या विद्वानांचें मी स्वागत करूं शकलों नाही त्यांच्या निदर्शनास मी हें आणूं इच्छितों की, शक्य तितकीं पानें– प्रसंगीं थोडीं वाढवूनहि– अभ्यागतांना देऊन, मी स्वतःहि अगदीं अंग आवरून कोनाकोपऱ्यांत उभा राहात आलों आहे; तेव्हा ही परिस्थिति ध्यानीं घेऊन मला क्षमा करावी.

उपरोक्त अडचणींचा निरास कसा करायचा ? पत्रिकेची पृष्ठसंख्या वाढविणें किंवा ती मासिक करणें. पण हें करायचें म्हणजे खर्चाचा प्रश्न येतो. आज सदस्यांची वार्षिक वर्गणी तीन रुपये असून ह्या वर्गणींतच पत्रिकेचे ( चालू आकारपृष्ठांचे ) चार अंक सदस्याला देण्याचें असल्यामुळे पत्रिकाखर्च बाजूला काढतां उरणाऱ्या आणे-पैमध्ये परिषदेचा संसार कसा चालायचा हाच मुळी पेंच पडतो. अशा स्थितींत तुटीच्या अंदाजपत्रकाची तोंड मिळविणी करतांना जिथें यातायात पडते तिथें पत्रिकेची पृष्ठें वाढविण्याने जें ओझें वाढेल तें पेलायचें कसें ? सभासदत्वाची वर्गणी वाढविणें किंवा चालू वर्गणींत पत्रिकेचा अंतर्भाव न करतां तिची स्वतंत्र वर्गणी करणें, ह्या उपायांना बहुसंख्य सदस्यांची संमति मिळणें शक्य दिसत नाही. कारण हे उपाय परिणामीं हानीकारक ठरतील अशी त्यांना भीति आहे आणि ती निरर्थक आहे असें तरी कसें म्हणावें ?

आणखी एक उपाय आहे. परिषदेच्या कार्यकारी मंडळाने मराठीचा दशखंडात्मक इतिहास, विष्णुशास्त्री सभागृह, संदर्भ ग्रंथालय, यांसारख्या मोठाल्या व महत्त्वाच्या योजना आंखल्या असून वाटमार्गी केल्या आहेत, हें वाचक जाणतातच. या योजना सिद्धीस गेल्याशिवाय नवीन योजना सुचाविणें म्हणजे भारावलेल्या खांद्यावर आणखी एक ओझें लादल्यासारखें होईल. पण बोलून ठेवल्याने बिघडत नाही, म्हणून सुचावितों की, पत्रिकेसाठी कायमनिधी उभारण्यांत यावा. सभासदांना पत्रिकेचें प्रलोभन आहे तर असूं दे. पण तिच्यासाठी असा स्वतंत्र निधि जमवावा की, त्याच्या व्याजांतून पत्रिकेचा निम्माशिम्मा तरी खर्च भागावा. अर्थात् ह्या निधी कांही थोडा थोडका असून भागणार नाही, हें उघड आहे.

पत्रिकेचें सांप्रतचें स्वरूप असें आहे कीं, ग्रँटसाठी पुणें विद्यापीठाला आणि सरकारी शाळाखात्याला आवाहन करायला हरकत नाही. अशा स्वरूपाची मायापाखर पत्रिकेवर घालायला कोणी कां–कूं करायचें कारण नाही. विद्येची प्रतिष्ठा राखायला हवी अशी ज्यांना तळमळ आहे त्यांनीं हस्तें परहस्तें 'पत्रिके'ला मदत करावी.

* * *

## मुंबईचें "साहित्य" आणि पुण्याचें "नवभारत"

आपली गुजराण कशी करायची ही विवंचना एकट्या 'पत्रिके'लाच आहे असें नव्हे. रंजनापलीकडे जाऊन, जनतेच्या संस्कृतिसंवर्धनाची, कलाक्षेत्रांत उच्च अभिरुचि सांभाळण्याची आणि ज्ञानोपासनेची चाड ठेवून जीं नियतकालिकें चालूं पाहात आहेत तीं निरंतर चालतील कीं नाही, ही विवंचना नेहमीच वाटत आली आहे. मुंबई मराठी साहित्यसंघाने सुरू केलेलें "साहित्य" ह्या नियतकालिकाचेंच उदाहरण घ्या. संघाच्या सदस्यत्वाची जी वर्गणी आहे तीमधून तें नियत नाही आणि तीमधेंच तें सदस्यांना मिळत नाही. त्याचेसाठी निराळी वर्गणी आहे. पण म्हणूनच त्याच्या प्रपंचांत जमाखर्चांची तोंड-मिळविणी

होत नाही ! तीच कहाणी आहे सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त मंडळाच्या "नव भारत" मासिकाची ! 'साहित्या'ला अनुभवाच्या दृष्टीने मुरलेले व कुशल असे संपादक—वा. रा. ढवळे लाभलेले आहेत. नवभारताचे संपादकमंडळ आचार्य जावडेकर, आचार्य भागवत, श्री. मोहनी व श्री. वेडेकर ह्या विद्वद्वर्यांचें बनलें आहे. पण ह्या दोन्ही मासिकांना मराठी वाचकांचा आश्रय निर्वाहापुरताहि नाही ही खेदाची गोष्ट नव्हे का ? विदर्भ साहित्य संघाचें मुखपत्र "युगवाणी" ह्याच्या संपादकांचा अनुभवहि कांहीं वेगळा असेल असें वाटत नाही !

ह्याच अनुरोधाने नागपूरचे 'सुषमा' मासिकहि उल्लेखनीय आहे. त्याची वैचारिक पातळी आणि अभिरुचि उच्च प्रकारची असून संपादक तें पदरमोड करून चालवीत आहेत. श्री. खानोलकरांचें साप्ताहिक 'रविवार' आणि मिरजेचें साप्ताहिक 'माउली' ह्यांना नीट योगक्षेम चालण्याइतका लोकाश्रय लाभेल का हेंहि पाहावयाचें आहे.

आपल्या जीवनाचा धर सुटत चाललेला आहे. तो सावरून व सबळ ठेवून, आणखी नवीन निर्माण करून जीवन सामर्थ्यशाली बनविणें हें साहित्याचें काम आहे. त्या कामासाठीं बद्धपरिकर झालेल्या नियतकालिकांना जगण्याचा प्रश्न पडावा ?

आँद्रे मार्वा ह्या प्रसिद्ध फ्रेंच लेखकाने, गेल्या महायुद्धांतील आपल्या नेमणुकीवर रुजू होण्याच्यापूर्वी Unfinished Story ह्या नांवाचा एक आत्मपर लेख लिहिला होता. लढाईवर जाणारे सैनिक एकपरीने सर्वांचा निरोप घेऊन, जिवावर उदार होऊन निघालेले असतात. आयुष्याच्या त्या अखेरच्या काळांत ते वाचनासाठी जें वाङ्मय निवडतात तें अरबट—चरबट, पांचट—पाचकळ निवडत नाहीत; तर विदग्ध, वैचारिक, किंबहुना, तत्त्वज्ञानयुक्त असें वाङ्मय निवडतात, असा ग्रंथविक्रेत्यांचा अनुभव आहे, असें त्याने त्या लेखांत नमूद केलेलें आहे. कोणत्या क्षणीं आपलें मस्तक धडापासून वेगळें होईल ह्याचा नेम नाहीं, अशा अशाश्वत अवस्थेंत वावरतांनाहि आपलें मस्तक उदात्त विचारांनीच समृद्ध करण्याची ते अभिलाषा ठेवतात असें आंद्रे मार्वा म्हणतो. ह्या त्याच्या विधानाशीं मराठी वाचकांची उपरोक्त वृत्ति पडताळून पाहण्यासारखी आहे. ज्यांना आपल्या जीविताला स्थैर्य व शाश्वती आणायची आहे त्यांनी उच्च अभिरुचीच्या साहित्याची किती आग्रहाने आणि निष्ठेने कास धरली पाहिजे हें सांगायला का हवें ?

पण सांगावें लागत आहे खरें ! मराठी वाचकांनी उपरोक्त नियतकालिकांच्या सांस्कृतिक कार्यास हातभार लावण्यास कर्तव्यबुद्धीने प्रवृत्त व्हावें.

* * *

## ज्ञानप्रकाश--शताब्दपूर्ति--महोत्सव

पुण्याच्या ज्ञानप्रकाश दैनिकाने एकशें एकाव्या वर्षात नुकतेंच पदार्पण केलें. ह्या त्याच्या सुदैवाबद्दल त्याचें मुक्तकंठ अभीष्टचिंतन करणारे समारंभ ठिकठिकाणीं झाले. ह्या अनन्यसाधारण सद्भाग्याबद्दल आम्हीहि त्याचेवर गौरववाक्सुमनाञ्जली उधळीत आहोंत.

मानवी आयुष्याची परिसीमा साधारणतः शंभर वर्षे मानली जाते. हें भाग्य फार थोड्यांच्या वांटणीस येतें. Russia claims that she has 29000 citizens over 100 years old—more than any other country.

—The Times of India, 31-3-49.

रशियाने नुकत्याच मिरविलेल्या ह्या शेखीचा सारांश हेंच सूचित करतो. ] इतकेंच नव्हे तर, साठी उलटली जाणें हेंहि, अल्पायुष्याचा जणू शापच असलेल्या आपल्या ह्या देशांत, महद्भाग्य मानावें लागतें. नाही तर, षष्ठ्यब्दपूर्तिसमारंभ कशाला करावयाला हवे होते ?

पण संस्थेकडे मानवी आयुष्याच्या त्या मर्यादेने बघायचें कारण नाही. संस्था एखाद्या बलशाली राजघराण्याप्रमाणें शतकानुशतकें नांदायला काय हरकत आहे ? पण ह्याहि बाबतींत महाराष्ट्र तितका सुदैवी नाही. संघटित कार्य करण्याच्या वृत्तीचा अभाव, अहंमन्यता, बेदिली, दुही इत्यादि अवगुणांनी आमच्या कितीक संस्था रसातळास गेल्या असतील किंवा पोखरल्या गेल्या असतील ! आणि म्हणूनच 'ज्ञानप्रकाश'ची शताब्दपूर्ति उत्सवार्ह गणली गेली. एरव्ही, मानवी आयुष्याच्या कमाल मर्यादेच्या दृष्टीने नियतकालिकाला वार्धक्य प्राप्त झालें असे म्हणायचें प्रयोजनच नाही.

नियतकालिक कधीहि वृद्ध होत नाही. नदीप्रमाणें तें अखंड तरुणच असतें. दरवर्षी नदीला पूर येत असतो आणि त्याच्या वेगामुळे पात्रांत हळूहळू एकसारखा, कधीमधी अवाचित, फरकहि पडत असतो. पूर्वी जिथे पात्र उथळ असावें तिथे अवाचित डोह निर्माण झालेला दिसतो. कुठे उजव्या तीराने वाहणारा ओघ डाव्या तीराने जाऊं लागतो. तथापि नदी तीच असते. त्याचप्रमाणें तिच्या पाण्याची गत. प्रवाहांतलें पाणी तसें पाहिलें तर सारखें बदलतच असतें—पहिलें पुढें सरकून सागरांत विलीन होतें आणि दुसरें नवीन तिथे येते. क्षणाक्षणाला आणि कणाकणाने हें नाविन्य प्रगटत असतेंच. तथापि नदी तीच आणि तिची यौवनमदमत्तताहि तशीच कायम असते. नियतकालिकांचें जीवितस्वरूप तरी ह्यापेक्षा निराळे कुठें असतें ? प्रतिदिनीं तें काळसागरांत आत्मिक अर्घ्यदान करीत असतें आणि बदलत्या कालमानानुसार आपल्या चालींत आणि आपल्या उद्गारांतहि ( कल्लोलांत ) बदल करीत असतें. तथापि त्याचे गुणधर्म, त्याचें बिरुद, सामग्र्याने जीविताकडे पाहण्याचें धोरण–थोडक्यांत बोलायचें म्हणजे त्याचें एकंदर व्यक्तिमत्व नदीप्रमाणें एकच एक व अखंडित असतें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. तेव्हा, कितीहि वर्षे लोटलीं तरी—

असति सरिते ! परी तूंच चिरयौवना

ह्याच कविवचनाचा अनुवाद नियतकालिकाच्या बाबतींतहि करायला हरकत नाही.

ज्ञानप्रकाशला लोकमतांची चिरकालिकता आणि महती लाभो आणि स्वतंत्र भारताची उज्ज्वल सेवा बजावून तो आपल्या मातेची– भारतसेवकसमाजाची– कूस सार्थपणें धन्य करो.

* * *

## शोकसमाचार—

वि. कृ. नेरुरकर हे दि. १९।३।४९ रोजीं आणि शं. प. जोशी हे दि. १६-२-४९ रोजीं दिवंगत झाले. श्री. नेरुरकर यांनी कवि, नाटककार, कथालेखक अशा अनेक नात्यांनी मराठी वाङ्मयांत भर घातलेली आहे. शिक्षक व शिक्षणाधिकारी म्हणून त्यांनी व्यवसाय केला होता, त्यामुळे बालवाङ्मयनिर्मितीचें श्रेयहि त्यांनी बरेंच संपादन केलें आहे. श्री. जोशी ह्यांना विचित्रलीला व खडाष्टक ह्या नाटकांमुळे सर्व मराठी वाचकवर्ग ओळखतो. हीं नाटकें महाराष्ट्र रंगभूमीवर एके काळीं यशस्वी रीत्या नांदलीं आहेत. ह्या उभयतांच्या निधनाबद्दल आम्हांस वाईट वाटत आहे.

अनुक्रमणिका

डॉ. वा. का. किर्लोस्कर ( निधनदिन १५-२.४९ ) आणि मुंबईचे केशव आप्पाजी पाध्ये ( निधनदिन १-१-४९ ) ह्या उभयतांचा शोकसमाचारांत समावेश करतांना आम्हाला दुःख होत आहे. एक नामवंत लेखक म्हणून डॉ. किर्लोस्कर हे वाचकांना ज्ञात आहेत. श्री. पाध्ये यांचा म. सा. परिषदेशी घनिष्ट संबंध होता.

* * *

## महाराष्ट्र साहित्य संमेलन

गतवर्षी महात्माजींच्या वधानंतर देशांतील स्वास्थ्य बिघडलें आणि शोकाच्या छायेंत अनिष्ट आचाराची धूळ उसळल्यामुळे संमेलन भरविण्यासारखी मनःस्थिति राहिली नाही, म्हणून मुंबई मराठी साहित्य संघाने पूर्वी दिलेलें आमंत्रण परत घेतलें. यंदा पुणें येथील नगर वाचनालयातर्फे संमेलनाचें बत्तीसावें अधिवेशन मे महिन्यांत दिनांक १४, १५, व १६ रोजीं भरणार असल्याचें मुक्रर झालें आहे.

महामहोपाध्याय पोतदार आणि आचार्य शं. द. जावडेकर

यांची अनुक्रमें स्वागताध्यक्ष आणि अध्यक्ष म्हणून योजना झाली आहे. परसत्तेमधून भारतवर्षाची मुक्तता झाल्यानंतर आणि विशेषतः महात्माजीप्रणीत तत्त्वज्ञानापासून महाराष्ट्र दूर जात आहे कीं काय असा प्रश्न भेडसावूं लागल्यानंतर भरणाऱ्या ह्या अधिवेशनाला महात्माजींच्या तत्त्वज्ञानांत मुरलेले थोर साहित्यिक अध्यक्ष म्हणून लाभत आहेत, ह्या घटनेचें कोणीहि मनापासून स्वागत करील. समाजजीवन अत्यंत विशुद्ध असल्याशिवाय राष्ट्राचा उत्कर्ष नाही आणि समाजजीवनाची शुद्धाशुद्धता लोकाग्रणी आणि साहित्यिक ह्यांच्या आचार-विचारांवर अवलंबून असते. सत्याकडे पाठ फिरविणें, न्यायाची चाड न बाळगणें, परमताबद्दल असहिष्णुता धरणें, कर्तव्यांत कसूर करणें, स्वार्थापलीकडे नजर न टाकणें, आत्मदोषाबद्दल अंध असणें आणि सत्तेच्या बळावर दुसऱ्यांना दडपणें ह्या अवगुणांचाच समाजांत जोर होत जाणार अशीं लक्षणें दिसत असतांना निर्मळ दृष्टीचे तत्त्वज्ञानी मार्गदर्शक म्हणून अग्रभागीं सुप्रतिष्ठित व्हायलाच हवेत.

प्रा. पोतदार ह्यांनी मराठी साहित्य-मंदिरांतील आणि सांस्कृतिक क्षेत्रांतील अनेक मानाचीं स्थानें विभूषित करून समाजाचा संसाररथ योग्य दिशेनें चालता ठेवला आहेच. आचार्य जावडेकरांची यंदा जोड लाभत आहे. ह्या दोन थोर पुरुषोत्तमांच्या नेतृत्वाने यंदाच्या अधिवेशनाला विशेष महत्व प्राप्त झालें आहे.

* * * *

## कविसंमेलन

उपरोक्त अधिवेशनाच्या कार्यक्रमांत एक दिवस कविसंमेलनासाठी राखून ठेवण्यांत आला असून, स्वागताध्यक्षपदीं श्री. वि. द. घाटे ह्यांची निवड झाली आहे. श्री. घाटे हे एक शिक्षणशास्त्रज्ञ आणि शिक्षणाधिकारी आहेत. "नाट्यरूप महाराष्ट्र" ह्या अभिनव व रसोत्कट पुस्तकाने त्यांची इतिहासप्रियता, "कांही म्हातारे व एक म्हातारी" ह्या ग्रंथाने त्यांची व्यक्तीचित्रणांतील सूक्ष्मता व मार्मिकता आणि रविकिरण-मंडळाच्या प्रकाशनांतून त्यांची कवित्वशक्ति वाचकांच्या प्रेमादरास पात्र झाली आहे.

ह्या निवडीबद्दल कार्यकर्त्यांना धन्यवाद देऊन या त्रिवर्गांचें आम्ही स्नेहादराने अभिनंदन करतो.

—य. दि. पेण्ढरकर

## — परीक्षणें —

**पांच संतकवि**—ले. डॉ. शं. गो. तुळपुळे, प्र. अध्यात्मविद्या ग्रंथमाला, सांगली.

विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी 'संस्कृत कविपंचका'चा परामर्श घेतल्यापासून परामर्शात्मक वाङ्मयांत पंचकाची रूढीच पडल्यासारखें दिसत आहे. आधुनिक कविपंचक (माडखोलकर) आणि प्राचीन कविपंचक (पंगु) हीं पुस्तकें या परंपरेंत निघाल्यानंतर आता पांच संतकवी हें डॉ. तुळपुळे यांचें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. प्रा. पंगु यांच्या प्राचीन कविपंचकां'त पंडित अथवा पंत कवि यांच्या कवित्वाची चर्चा आली असल्याने संतकवि हे प्राचीन असूनहि तें नांव डॉ. तुळपुळे यांना आपल्या पुस्तकास देतां येईना. तेव्हां पांच संतकवि हें साधें नांवच स्वीकारून डॉ. तुळपुळे यानी आपला ग्रंथ वाचकांपुढे ठेवला आहे. या संतकवींत त्यांनी ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम आणि रामदास या पांच संत म्हणून सर्वमान्य अशा कवींचा व त्यांच्या वाङ्मयाचा परामर्श घेतला आहे. प्राचीन मराठी वाङ्मयामध्ये या पांच महनीय व्यक्ति होऊन गेल्या यांत शंका नाही. वाङ्मयाच्या दृष्टीनें त्यांचें जितकें महत्व आहे, तितकेंच, किंबहुना, अधिकच, संत म्हणून आहे. कवि आणि संत या दोनाहि दृष्टींनी त्यांच्या विषयीचें आपलें हें प्रतिपादन डॉ. तुळपुळे यांनी आखलें आहे. या प्रत्येक कवीच्या चरित्राची आणि चारित्र्याची कल्पना ते प्रथमतः देतात; नंतर त्या संतांचें तत्त्वज्ञान काय होतें, त्यांचें नीतिशास्त्र कोणत्या स्वरूपाचें होतें, त्यांचा साक्षात्कारमार्ग किंवा परमार्थानुभव कोणत्या प्रकारचा होता इत्यादि सामान्यतः कवित्वांत समाविष्ट न होणाऱ्या विचारांची चर्चा ते करितात; त्या नंतर त्या संतांच्या कवित्वाचें स्वरूप कशा प्रकारचें आहे तें व त्यांच्या कामगिरीचें वैशिष्ट्य सांगून समारोप करितात. प्रत्येक कवीविषयी त्यांनी केलेल्या चर्चेची मांडणी ही अशी रेखीव आणि व्यवस्थित झाली आहे. तींत उताऱ्यांचा पाल्हाळ नाही, ऐकीव दंतकथांची भरती नाही, कोणताहि महत्त्वाचा मुद्दा गळला नाही. हें करीत असतां एक महत्वाचें सूत्र डॉ. तुळपुळे यांनी कायम राखलें आहे. या संतकवींच्या वाङ्मयांत आणि व्यक्तित्वांत त्यांचें स्वतःचें वेगळेंपण लक्षांत घेऊनहि त्या सर्वांची मूळ भूमिका अध्यात्माचीच होती असें म्हणावें लागतें, हें तें सूत्र होय. याबाबत विद्वानांत मतभेद असला तरी तुळपुळे यांच्या प्रतिपादनास त्यामुळे एकसूत्रता आली आहे, यांत शंका नाही. त्यांचा स्वतःचा त्यावर विश्वास आहे. तुळपुळे हे स्वतः आधुनिक असले तरी त्यांची संतकवींवरील श्रद्धा लक्षणीय आहे. संतांचें वाङ्मय समरसतेने वाचून त्यांनी तें आपलेसें केलें आहे याचा प्रत्यय या सबंध पुस्तकांत येत आहे. 'त्यांची भाषा रसाळ अशा संतवाणींत सुस्नात झाली आहे' असें प्रस्तावनाकार त्यांचे गुरु प्रा. रा. द. रानडे यानी जें म्हटलें आहे, तें खरें आहे.

डॉ. तुळपुळे यांनी आपल्या प्रारंभींच्या निवेदनांत या पुस्तकाची निर्मिति कशी झाली तें सांगतांना म्हटलें आहे, "कांही वर्षांपूर्वी मराठी वाङ्मयेतिहाससंबंधी संशोधन करण्याची कामगिरी विद्यापीठाने मजवर सोपविली, व प्रस्तुत ग्रंथ हें त्यापैकींच (तिचेंच ?) फळ होय" नवीन असें संशोधन या ग्रंथांत असल्यास अत्यल्प आहे. उपलब्ध सामग्रीचाच परामर्श घेऊन त्यासंबंधी निर्णय सांगण्याचें कामच अधिक आहे. त्यामुळे त्या त्या कवींच्या व्यक्तित्वाविषयीं

आज ज्या कल्पना बहुमान्य आहेत, त्या कल्पनांशिवाय निराळें असें फारसें तुळपुळे यांना सांगतां आलें नाही. उपलब्ध सामग्री पारखून घेण्याचा विलक्षणपणा त्यांनीं स्वीकारला आहे हें अर्थात् योग्य झालें. म्हणून पांगारकरांची अति श्रद्धाळु किंवा भावे यांची रसिकत्वाने आकुलित झालेली दृष्टि येथे दिसत नाही. तथापि या दृष्टींतहि अध्यात्मवादाचे प्राधान्य झाल्याने तुळपुळे यांनी दिलेल्या निर्णयांनी जुन्या कवींविषयींच्या वादग्रस्त मुद्यांचा निकाल लागला असें होत नाही. स्वतः तुळपुळे यांच्या मनांत मात्र फारशा शंका उरलेल्या नाहीत. ' हा मुद्दा आता वादातीत आहे ', ' याविषयी कोणी शंका घेऊं नये ', 'हा वाद आता निकालात निघाला आहे ', अशी विश्वासाची भाषा ते बोलतात. इतरांचीं मतें भ्रान्त आहेत असें यांचें निभ्रान्त मत पाहून कौतुक वाटतें. परंतु वादविषय प्रश्नांचा एवढ्याने निकाल लागतो असें नाही. त्यांतून आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ ' अंतःकरणप्रवृत्ति ' किंवा ' मनोमय साक्ष ' या प्रमाणाचा उपयोग जेव्हा ते करितात, तेव्हा त्यांच्या चिकित्सक दृष्टीच्या आवरणाखाली श्रद्धेची, भावनेची भूमिका असल्याचें दिसून येतें. ही दृष्टि संशोधकाची किंवा संशोधनाची नसून भक्ताची वाटते.

डॉ. तुळपुळे हे एका परमार्थ संप्रदायामधील आहेत. आध्यात्मिक दृष्ट्या गुरुप्रमाणे असणाऱ्या प्रा. रानडे यांच्या चष्म्यांतूनच ते प्राचीन वाङ्मयाकडे पाहतात. म्हणून ज्ञानेश्वरांची दृष्टि सामाजिक होती हें फाटकांचें मत त्यांना मान्य होत नाही. सर्व संतकवींनी लिहिलेलें वाङ्मय हें आध्यात्मिक दृष्टीने समाजांतील व्यक्तींची आध्यात्मिक उन्नति डोळ्यांपुढे ठेवून लिहिलेलें आहे, त्याचा सामाजिक दृष्ट्या उपयोग झाला, तरी ती त्यांची मूळ भूमिका नव्हती असें त्यांचें मत आहे. हें मत जसें प्रा. रानडे यांचें आहे, तसेंच त्यांचेंहि आहे. नुसतें मतच तसें आहे असें नाही. त्यांचा हा ग्रंथहि प्रा. रानडे यांच्या Mysticism in Maharastra या ग्रंथावरून सुचलेला दिसतो. प्रा. रानडे यांनी हेच पांच कवि निवडले आहेत. आपल्या चर्चेची मांडणी रानडे हेहि अशीच करितात. विवेचनाच्या आधारास घेतलेले उतारेहि केव्हा केव्हा तेच व त्याच क्रमाने, दोन्ही पुस्तकांत येतात हें ' पाच संतकवि ' या पुस्तकांतील रामदासविषयक प्रतिपादनाची रामदास वचनामृताशीं तुलना केली असतां दिसून येतें. ' ज्ञानदेवांचें नीतिशास्त्र ' हा शब्दप्रयोगहि मराठीपेक्षा इंग्रजी वाटतो याचें कारणहि हेंच आहे. आपल्या ग्रंथास प्रेरणा प्रा. रानडे यांच्यापासून मिळाल्याचें डॉ. तुळपुळे सांगतात. त्याचा अर्थ व्यक्तीकडून प्रेरणा मिळाली असा घेण्याऐवजीं त्या व्यक्तीच्या ग्रंथापासून मिळाली असा घेणेंच उचित होईल. प्रा. रानडे यांनी तुळपुळे यांच्या ग्रंथास नवीन म्हटलें हें त्यांना साजेसेंच आहे, परंतु प्रा. रानडे यांच्या ग्रंथाशीं ज्यांचा परिचय आहे, त्यांना प्रस्तुत ग्रंथावर प्रा. रानडे यांच्या ग्रंथाची छाया किती प्रमाणांत पडली आहे याची कल्पना आल्यावाचून राहणार नाही. पण असें म्हटल्याने त्याचें महत्त्व व उपयुक्तता कमी ठरतात असें नाही. प्रा. रानडे यांनी इंग्रजीमध्ये प्रकट केलेल्या मतांचें उपपादन मराठीमध्ये सविस्तर व्हावयास हवेंच होतें. कारण संतवाङ्मयाकडे पाहण्याचा तो एक महत्वाचा दृष्टिकोण आहे. तो दृष्टिकोण डॉ. तुळपुळे यांनी प्रा. रानडे यांच्यापेक्षाहि अधिक सुबोध आणि रसाळ पद्धतीने मांडून दाखविला ही कामगिरीहि कांही कमी महत्त्वाची नाही.

—( प्रा. ) रा. श्री. जोग

" चिपसूची स्मृतिचित्रे "—(लेः—जेम्स हिल्टन;अनुवादकः—श्री.वि. द. साठे; ३१७ सदाशिव, पुणें २. किंमत ३ रुपये. )

श्री. वि. द. साठे यांच्या 'मराठी नाट्यकथा' या पुस्तकानंतरचा हा अनुवाद नुकताच प्रसिद्ध झालेला आहे. त्यांच्या वर उल्लेखिलेल्या पुस्तकानें ज्या अपेक्षा निर्माण झालेल्या आहेत त्या पूर्ण झाल्याचा प्रत्यय 'चिपसूची स्मृतिचित्रें' या सुंदर अनुवादांत येतो. अनुवाद करीत असतांना लागणारा रेखीवपणा साठ्यांच्या वृत्तींत आहे. त्यामुळे मुळांतील कांहीं प्रसंग ताडून पहाण्याचा मोह मला झाला; अर्थातच अनुवादकाचें भाषाप्रभुत्व व अनुवादाला लागणारी 'फडके' घराण्यांतील 'लवचिक' आणि "प्रासादिक" शैलिही त्यांच्या लेखनांत असल्याची साक्ष पटली. उत्कृष्ट कलाकृति सूचकतेतून किती तरी गोष्टी साधते याचा पुनः प्रत्ययही आला. परंतु चिप्सनें 'चहापाणी' केलें इ. प्रयोग व त्यांची झालेली पुनरुक्ति टाळावयास हवी होती असें वाटतें. तद्वतच हें पुस्तक चौकस वाचकांनाही तृप्त करील या बुद्धीनें आणखी कांहीं टीपा संपादनाच्या परिपूर्णतेच्या दृष्टीनें आवश्यक होत्या. त्या मुळांतही नाहींत ही सबब टिकणारी नाहीं. आणखी एक गोष्ट. रॉबर्ट डोनेट्चे चित्र आहे या मुखपृष्ठापेक्षां अधिक विलोभनीय खासच झालें असतें. तद्वतच प्रकरणाचें आकडे फारच बटबटीत आहेत. या सुधारणा द्वितीयावृत्तींत होतीलच.

श्री. केशवराव भोळे यांची प्रस्तावना हा ग्रंथाला लाभलेला बहुमोल अलंकार आहे !

—(प्रो.) चंद्रकुमार डांगे.

**माक्सिम गोर्की**—किं. १॥ रु. माक्सिम गोर्कीच्या लघुकथा–खंड १ ला, किं. २ रु. माक्सिम गोर्कीच्या लघुकथा–खंड २ रा., किं. २ रु. [ अनुवादकः— श्री. स. ह. मोडक; प्रकाशकः—शकुंतला मोडक, लोकसाहित्य, ८७ शिवाजी पार्क, मुंबई २८. ]

लोकसाहित्यातर्फे प्रकाशित झालेले हे अनुवाद वैशिष्टयपूर्ण आहेत. माक्सिम गॉर्कीचें नांव जागतिक वाङ्मयांत अमरत्व पावलेले असल्यामुळे, लेखकाबद्दलची उत्कंठा, चरित्र आणि वाङ्मय या सुंदर अनुवादाने तृप्त होईल यांत मुळींच शंका नाहीं. गॉर्कीचे कथासंग्रह वाचण्यापूर्वी हें चरित्र वाचणें अत्यंत उपयुक्त होणार आहे. कारण त्यामुळें गॉर्कीच्या वाङ्मयाला लाभलेली आत्मानुभूतीची आणि विशालत्वाची भूमिका आकलन होण्यास मदत होईल. लोकसाहित्याची निर्मिती केवळ अवलोकन आणि सहानुभूति यावर अवलंबून नसून त्यासाठीं खऱ्याखुऱ्या 'आत्मानुभूतीची' कशी आवश्यकता लागते हे नव्या लेखकांना मार्गदर्शक होण्यासारखें आहे. खिस्टोफर कॉड्वेल या मार्मिक आणि चिकित्सक ग्रंथकाराने विशद केल्याप्रमाणें जीवन आणि साहित्य यांचा परस्परपूरक संबंध कसा येऊं शकतो याचे जिवंत उदाहरण म्हणजे माक्सिम गॉर्कीचे जीवन होय.

गॉर्कीच्या सात लघुकथा आणि दोन दीर्घ कथा दोन खंडांत प्रसिद्ध झालेल्या आहेत. त्याबरोबरच 'जागतिक वाङ्मय' आणि 'मी लिहायला कसा शिकलो' या छोट्या प्रस्तावना अत्यंत महत्वाच्या आहेत. 'एकेकाळीं माणसें असलेले प्राणी', 'त्यांनीं एक गाणें रचले', 'चेल्कास' या गोष्टींनी गॉर्कीच्या अभ्यासकांना मोहवून टाकले होते. त्या कथांचा अनुवाद करतांना व इतरत्रही अनुवादकानें दाखविलेलें वर्णनकौशल्य पदोपदीं दृष्टीस पडतें. प्रचंड राक्षस 'आर्योम' आणि मित्रा 'केन' यांची ओळख कोणीही विसरणार नाहीं. कलेच्या आणि तंत्राच्या रूढ कसोट्या वापरून हें लेखन केलें गेलेलें नाहीं. मध्यमवर्गीय आणि

सुखवस्तु कलावंतांना आणि विद्वान टीकाकारांना हें वाङ्मय आकर्षक वाटले नसल्यास नवल नाहीं. कारण गॉर्कीचा लेखनकाल हा नव्या क्रांतिपूर्वीचा संक्रमण काल होता. सहाजीकच गॉर्कीने विलक्षण उपेक्षा अनुभविली तरी कालपुरुषानें अखेर न्याय दिला. रशियांतीलच नव्हे तर जगांतील सर्व रसिकांनी गॉर्कीला मानाचा मुजरा केला. माणुसकीचें इतकें बोचक आणि हृदयस्पर्शी चित्र रंगविणारा गॉर्की रशियांतील नव्या क्रांतीचा उद्‌गाता ठरला. अशा गॉर्कीला देखील सत्तेचा जाच सोसावा लागला. प्रचाराच्या धुंदींत काय होते याचा पुरावा The Soviet Literary Page यासारखे अधिकृत लेख सहज देतात. मग गॉर्की व त्याचे समकालीनांना सत्तेचे फटकारे बसले यांत नवल काय ? तरी गॉर्कीच्या वाङ्मयानें मानवजातीवर केलेलें ऋण फार मोठें आहे हें निर्विवाद.

श्री. स. ह. मोडक यांनीं केलेले चरित्र-कथांचे हे अनुवाद निःसंशय मोलाचे आहेत. अनुवादकाला धन्यवाद. गॉर्कीची छायाचित्रें हें पुस्तकाचें विशेष आकर्षण आहे.

—(प्रो.) चंद्रकुमार डांगे.

**ग्रंथालयीन वर्गीकरण व सूचिलेखन**—(ले० वा. पु. कोल्हटकर, प्रका० एन. के. पब्लिशींग हाउस, पुणें २. मूल्य प्रत्येकीं ८ आणे)

लोकशिक्षणाचें एक अंग म्हणून ग्रंथालयाकडे सरकारनें विशेप लक्ष घातल्यापासून ग्रंथालयांना व पर्यायानें ग्रंथालय–शास्त्रालाहि चांगले दिवस लाभलेले दिसत आहेत. आदर्श ग्रंथालयाच्या सुव्यवस्थेबद्दल व ग्रंथांच्या वर्गीकरणपद्धतीबद्दल ज्या पांच सहा पद्धती रूढ आहेत त्यांत मद्रासचे डॉ. रंगनाथन् यांची द्विबिंदु वर्गीकरणपद्धति अधिक शास्त्रशुद्ध व व्यवहार्य म्हणून दिवसेंदिवस मान्यता पावू लागली आहे. या पद्धतीस अनुसरून पुण्याच्या महाराष्ट्र प्रादेशिक ग्रंथालयांतील एक ग्रंथपाल श्री. वा. पु. कोल्हटकर यांनीं पुस्तकांच्या वर्गीकरणावर व सूचिलेखनावर दोन छोट्या हस्तपुस्तिका प्रसिद्ध केल्या आहेत.

'सूचिलेखन' या पुस्तकांत ग्रंथालयीन सूचि ही पत्ररूपानेंच ठेवणें का इष्ट आहे याची प्रास्ताविक चर्चा करुन विविध विषयांवरील पुस्तकांचीं सूचिपत्रें कशीं तयार करावींत याचें प्रात्यक्षिक म्हणून एकंदर बावीस नमुने लिहून दाखविले आहेत. 'वर्गीकरण' या पुस्तकांत ग्रंथांच्या वर्गांकांची छोटी यादी दिली असली तरी हे वर्गांक कसे दिले गेले याचीं नमुन्यादाखल कांही उदाहरणें द्यावयास हवीं होतीं. त्याच्या अभावी या विषयाची दुर्बोधता शिल्लकच रहाते. या दोन्ही पुस्तिका म्हणजे त्यांच्या ग्रंथालयविषयक संकल्पित ग्रंथाची हीं दोन प्रकरणें आहेत. हीं प्रकरणें स्वयंपूर्ण असलीं तरी ग्रंथालयशास्त्राची ओळख करून घेण्यास सजलेल्या मनुष्याला एकदम पेलाभर पाणी देण्याऐवजी एक एक घोट देण्यासारखे आहे. या शास्त्राचा रसास्वाद असा घोटाघोटानेंच चाखावयास हवा असा युक्तिवाद करता येण्यासारखा असला तरी एकदमच तो ग्रंथ प्रकाशित झाला तर मौलिकतेच्या दृष्टीनें तेंच अधिक श्रेयस्कर असें मला वाटते.

—मो. रा. वाळंबे

---

**चुकीची दुरुस्तीः**— गेल्या अंकीं पृ. २४ वर प्रा. चिं. वि. जोशी असें नांव आलें आहे, त्याऐवजीं प्रा. चिं. नी. जोशी असें वाचावें. मुद्रणदोषाबद्दल सर्वांनीं क्षमा करावी.

म. सा. प. (२१-४-६)

# नवीन सभासद

कै. चिपळूणकर स्मारकासाठीं देणगी दिल्यामुळे झालेले

## तहहयात

( १ ) सौ. मालिनीबाई गुणे, ५८७।८ शुक्रवार, टिळक रस्ता, पुणें २

( २ ) श्री. वामन केशव सावळे, ४३१।३५ पुरंदरे कॉलनी, पुणें २

( ३ ) श्री. विष्णु हरी निसुरे, ५ वी गल्ली, धुळे ( प. खा. )

( ४ ) श्री. दत्तात्रय श्रीधर करंदीकर, माधवभुवन, धुळे ( प. खा. )

( ५ ) श्री. महादेव गोविंद मालेराव, वकील, अमळनेर ( पू. खा. )

( ६ ) श्री. विश्वनाथ महादेव साठे, कापडाचे व्यापारी, जळगांव(पू. खा.)

( ७ ) श्री. रा. सा. रुपचंद मोतीराम लाठी, जळगांव ( पू. खा. )

( ८ ) श्री. गुरुनाथ रामकृष्ण बर्वे, एजंट, व्हॉलकर्ट ब्रदर्स एजन्सी, जळगांव ( पू. खा. )

( ९ ) श्री. मुलतानचंद फुलचंदशेट संचेती, चाळिसगांव ( पू. खा. )

( १० ) रा. ब. डॉ. रामचंद्र व्यंकटेश मोने, अंमळनेर ( पू. खा. )

## साधारणचे तहहयात् झालेले सभासद

( १ ) श्री. गणेश विष्णु पेठे, पार्वती-निवास, मुरबाडरोड, कल्याण (ठाणें)

( २ ) श्री. वामन श्रीधर पुरोहित, १८७९ जुनी तांबट गल्ली, नाशिक.

( ३ ) श्री. सीताराम नरहर साने, ७६८।२१ 'यशवन्त', पुणें ४

## तहहयात सभासद

( १ ) प्रा. सौ. सरोज शेंडे, सुभद्रासदन, घोलेरोड, पुणें ५

## साधारण सभासद

( १ ) श्री. अनंत हरी घोलप, ४१७ गणेशपेठ, पुणें २

( २ ) श्री. गणेश काशीनाथ चितळे, २४१ शुक्रवार, पुणें २

( ३ ) सौ. मंगला गणेश चितळे, २४१ शुक्रवार, पुणें २

( ४ ) श्री. वासुदेव ज्योती देशपांडे, जुन्नर ( जि. पुणें )

( ५ ) श्री. वसंतराव सदाशिव चिंधडे, ४४ शनिवार, मालेगांव (जि. नाशीक)

( ६ ) दिनकर विनायक देव, ५८४ शनिवार, पुणें २

( ७ ) श्री. गुरुनाथ अनंत देशमुख, मु॥. शांतीसदन, पो. संजीवनपेठ, जि. बिदर ( निजाम )

( ८ ) प्रा. श्रीकृष्ण गोपाळ हुल्याळकर स. प. कॉलेज, पुणें २

( ९ ) श्री. ना. रा. शेंडे, धरमपेठ मेन-रोड, नागपूर

( १० ) श्री. गजानन नीळकंठ भवाळकर, महाजनचाळ, सीताबर्डी, नागपूर

( ११ ) श्री. भास्कर अण्णाजी मासोदकर, 'महाराष्ट्र' कार्यालय, महाल, नागपूर

( १२ ) वसंत गोविंद पेठे, ४६९ सदाशिव, पुणें २

( १३ ) श्री. यशवन्त लक्ष्मण आळवणी २२३ शनिवार, पुणें २

( १४ ) श्री. महादेव वासुदेव वाटवे, हिंदी शिक्षक, कऱ्हाड ( सातारा )

( १५ ) श्री. गो. म. कुलकर्णी, गोदा-भवन, गोडबोलेमळा, विजापूर

( १६ ) प्रा. वि. बा. आंबेकर, आग्रारोड, नाशिक

( १७ ) श्री. गजानन लक्ष्मण ठोकळ, ५६२।१ शिवाजीनगर, पुणें ५

( १८ ) श्री. वासुदेव रामचंद्र विवलकर, शिक्षक, माळीनगर, ( जि. सोलापूर)

( १९ ) श्री. राजेश्वर बळवंतराव देशपांडे, मंगळवारपेठ, मु. पो. हिंगोली, जि. परभणी ( निजाम )

( २० ) श्री. राजाराम गोविंद कुलकर्णी १७ आंग्रेचाळ, मुगभाट, मुंबई ४

( २१ ) दत्तात्रय रंगनाथ जानोरकर, १४२० हुंडीवाला लेन, नाशिक.

---

## साभार स्वीकार

१ **गांधी साहित्य सूचि**—संयोजक पां. ग. देशपांडे; प्रका. नवजीवन पब्लि. हाऊस, अहमदाबाद, मूल्य ३। रु.

२ **चित्रशाळा** ( नाटक )—ले. नाना जोग, प्रका. मनोहर ग्रंथमाला, टिळक-रस्ता, पुणें २; मूल्य १॥ रु.

३ **वलिदान**—ले. श्री. ज. बापट, प्रका- आर. जी. हुकेरी, दि स्टुडंटस् ओन् बुक डेपो, धारवाड; मूल्य दहा आणे.

४ **पहिलीं फुलें**—ले. तु. ता. सावंत; प्रका. वा. द. वापट, झावबाची वाडी, मुंबई २; मूल्य १ रु.

५ **कांहीं पावलें** ( रोजनिशी )—ले. ना. दादासाहेब मावळंकर; प्रका. महाराष्ट्र ग्रंथभांडार, कोल्हापूर; मूल्य २॥ रु.

६ **हिंदी ग्रामीण जीवनाचा प्रश्न**—ले. नानावटी आणि अंजेरिया, अनु. मो. स. श्रीखंडे; प्रका. महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर, मूल्य ७ रु.

७ **जय महाराष्ट्र** ( पोवाडा )—शाहीर न. शे. पोहनेरकर, गुंफराज प्रकाशन, भाई जीवनजी लेन, मुंबई २; मूल्य सहा आणे.

८ **कुरल**—अनु. साने गुरुजी, प्रका. कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २, मूल्य ३ रु.

९ **सोव्हिएट रशियाचा सर्वांगीण सर्वोदय**—ले. व प्रका. के. गो. गोखले, बसवण गल्ली, बेळगांव; मूल्य ६ रु.

१० **कुऽहुऽऽ** ( कवितासंग्रह ) कवि व प्रका. सुरेशबाबू भोसले, मंगळवार पेठ, कोल्हापूर; मूल्य २ रु.

११ **माणुसकीचा गहिंवर** (कथासंग्रह)- ले. व प्रका. प्रा. श्री. म. माटे, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य ३ रु.

१२ **कविता**—कवि व प्रका. ना. ग. जोशी, दांडयाबाजार, बडोदें, मूल्य १ रु.

१३ **म. गांधी गीतें**—सं. व प्रका. पां. श्री. टिल्लू, झावबाची वाडी, मुंबई २ मूल्य आठ आणे.

१४ **पोंक्षे कुल.वृत्तान्त**— संपा. भा. सी. पोंक्षे, प्रका. भारत इति. संशोधक मंडळ, पुणे २; मूल्य पांच रु.

१५ **खडकांतील पाझर**— ले. पं. महा- देवशास्त्री जोशी, ४२१ शनिवार, पुणें २; मूल्य २॥ रु.

१६ **गोंड स्त्री-गीतें**—ले. पं. महादेव- शास्त्री जोशी, ४२१ शनिवार, पुणें २, मूल्य २ रु.

१७ **क्रैव्याची मीमांसा**—ले. व प्रका. र. धों. कर्वे, राइट एजन्सी, गिरगांव, मुंबई ४; मूल्य सहा रु.

१८ एम्. जे. कॉलेज, जळगांव व कॉलेज फॉर गर्लस, पुणें २ यांचीं नियतकालिकें.

१९ नू. म. विद्यालय, इंग्रजी शाळा, पुणें २ व न्यू स्कूल, जुन्नर यांची नियत- कालिकें.

२० **सुलभ अर्थशास्त्र**—ले. प्रा. व गो. सहस्त्रबुद्धे, प्रका. अ. वि. गृह, सदाशिव, पुणें २; मूल्य ५ रु.

अनुक्रमणिका

## डेक्कन व्ह. ट्रा. सोसायटीनें सन १९४८।४९ चें दुसरें सहामाहींत बक्षिसें दिलेल्या पुस्तकांची यादी

| अ. नं. | पुस्तकाचें नांव | पुस्तककर्त्यांचें नांव | रक्कम रु. |
|---|---|---|---|
| १ | हिंदी हीच आमची राष्ट्रभाषा | प्रा. शं. दा. चितळे. | ५० |
| २ | साहित्य-दर्शन | सरोजिनी बाबर व वि.म.कुलकर्णी | ५० |
| ३ | कै. हरिभाऊ लिमये यांचे लेख | रा. अ. ह. लिमये | ४० |
| ४ | आपलें नागरिक शास्त्र | प्रा. वि. पां. वकील | ७५ |
| ५ | वासुदेव बळवंत फडके | रा. वि. श्री. जोशी | ६० |
| ६ | शिवशाहीचा अस्त | रा. वि. गं. लेले | ४० |
| ७ | आरोग्य-मंजरी | डॉ. गो. अ. ताह्मनकर | ६० |
| ८ | पुस्तक-बांधणी | रा. वि. ना. लिमये | ७५ |
| ९ | महानुभाव-पंथ | बाळकृष्ण महानुभावशास्त्री | ७५ |
| १० | सुख-संवाद | रा. वा. पु. दामले | ५० |
| ११ | शरीरशास्त्र व शरीरशिक्षण | रा. के. रा. पालकर | ३० |
| १२ | युद्ध-मुक्ति | रा. म. पां. नेने | ३० |
| १३ | अमोल आहेर | सौ. मालतीबाई दांडेकर | ४५ |
| १४ | महाराष्ट्र वाक्संप्रदाय भाग २ रा | सं. दाते-कर्वे | १०० |
| १५ | सावरकरांचे सहकारी | रा. शि. ल. करंदीकर | ४० |
| १६ | यावलीचा संग्राम | रा. ह. वा. देशपांडे | ५० |
| १७ | गार सावली | रा. म. भा. भोसले | ३० |
| १८ | उघडया जगांत | रा. म. भा. भोसले | ४० |
| १९ | जयहिंद | रा. शां. गो. गुते | ४० |
| २० | जातक-दीप | रा. द्वा. ना. राजे | ५० |
| २१ | शंकराजी नारायण पंतसचिव | रा. कृ. वा. पुरंदरे | ५० |
| २२ | गानलुब्धा मृगनयना | रा. र. वा. दिघे | ६० |
| २३ | डॉ. काशिबाई नवरंगे-चरित्र | बी. बी. केसकर | १८ |
| | | | एकूण रुपये ११५८ |

चिटणीस
डे. व्ह. ट्रा. सोसायटी,
पुणें २.

# महाराष्ट्र साहित्य परिषद्

## कार्यकारी मंडळ ( १९४९ ते १९५१ )

१ प्रा. श्रीपाद महादेव माटे ( कार्याध्यक्ष )
२ डॉ. रामचंद्र नारायण दांडेकर ( खजिनदार )
३ डॉ. अमृत नारायण भालेराव ( चिटणीस )
४ प्रा. वासुदेव दामोदर गोखले ( चिटणीस )
५ प्रा. अरविंद गंगाधर मंगरुळकर ( चिटणीस
६ श्री. यशवन्त दिनकर पेंढरकर ( संपादक--पत्रिका )
७ प्रा. रामचंद्र श्रीपाद जोग
८ प्रा. श्रीपाद रामचंद्र पारसनीस
९ प्रा. रामचंद्र शंकर वाळिंबे
१० श्री. दत्तो रामचंद्र कानिटकर
११ श्री. विष्णु सखाराम खांडेकर
१२ श्री. श्रीपाद शंकर नवरे
१३ श्री. शंकर गोविंद पटवर्धन
१४ श्री. मोरेश्वर रामचंद्र वाळंबे
१५ प्रा. विनायक महादेव कुलकर्णी

---

# महाराष्ट्र साहित्य परिषद्

## १९४८ – ४९ चें इतिवृत्त

वर्ष अखेर सभासदांची संख्या एकूण १३८० आहे. त्यापैकीं १००० साधारण असून उपकर्ते २, आश्रयदाते ६, सहाय्यक ८, हितचिंतक २४ तहह्यात सभासद ३४० अशी वर्गवारी आहे. परिषदेच्या निरनिराळ्या योजनांसाठी साधारण सभासदांपैकी कांहींनी उदार देणग्या दिल्यामुळे तहह्यात सभासदांच्या संख्येंत वाढ झालेली आहे. राजीनामे, थकबाकी वर्गणी व मृत्यु या कारणांमुळे यावर्षी बऱ्याच सभासदांचीं नांवे कमी झाल्यामुळे एकंदर सभासदांच्या संख्येत घट झालेली दिसेल. शाखासभा सभासदांखेरीजकरून बाकीदार सभासदांची संख्या सुमारे १०० आहे.

**आर्थिक परिस्थिति**— सोबत जमाखर्चाचा तक्ता, पडताळा व ताळेबंद अशी तीन पत्रकें जोडलीं आहेत. त्यांवरून परिषदेच्या आर्थिक परिस्थितीची कल्पना सभासदांस येईल.

**स्वाध्याय मंडळ**—परिषदेच्या वतीने होत.असलेल्या परीक्षांना बसूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी यावर्षींहि दरवर्षीप्रमाणें प्राज्ञ व विशारद या परीक्षांचे वर्ग चालू होते. प्रा. श्री. म. माटे, प्रा. वा. दा. गोखले, प्रा. गं. भा. निरंतर, डॉ. न. का. घारपुरे, प्रा. रा. शं. वाळिंबे, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. गोपीनाथ तळवलकर, प्रा. चंद्रकुमार डांगे प्रा. दु. का. सन्त, व श्री. ह. श्री. शेणोलीकर यांनीं मोठ्या आत्मीयतेने नेमलेल्या पुस्तकावर व्याख्यानें दिलीं.

**संमेलन**—महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे ३२ वें अधिवेशन पुणें येथे येत्या मे महि-यांत 'पुणें नगर वाचन मंदिर' या संस्थेच्यावतीने भरणार आहे.

**स्मृतिदिन**—परिषदेचे माजी अध्यक्ष कै. वा. म. जोशी यांच्या पाचव्या स्मृतिदि-नानिमित्त मंगळवार दि. २०।७।४८ रोजीं नागपूरचे सुप्रसिद्ध विद्वान् साहित्यिक डॉ. वि. भि. कोलते यांचे ' महानुभाव पंथ आणि वारकरी पंथ ' या विषयावर व्याख्यान झालें. कै. न. चिं. उर्फ तात्यासाहेब केळकर यांच्या प्रथम स्मृतिदिनानिमित्त शुक्रवार दि. १५।१०।४८ रोजीं डॉ. वि. पां. दांडेकर यांचे ' केळकरांच्या साहित्यविषयक कल्पना ' या विषयावर व्याख्यान झालें. कै. डॉ. माधवराव पटवर्धन स्मृतिदिन सोमवार दि. २९।११।४८ रोजीं प्रा. अनंत काणेकर यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला व त्याप्रसंगी प्रा. म. ना. अदवन्त यांचें ' गेल्या वर्षातील मराठी काव्य ' या विषयावर व्याख्यान झालें.

**व्याख्यानें**—शनिवार दि. ५ व रविवार दि. ६ जून १९४८ रोजीं विद्वद्रत्न डॉ. के. ल. दप्तरी यांचीं 'उपनिषदांचा बुद्धिप्रत्ययिक व वस्तुनिष्ठ अर्थ' या विषयावर प्रा. न. र. फाटक यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यानें झालीं. परिषदेच्या स्वाध्यायमालेतर्फे शनिवार दि. १७।७।४८ रोजीं प्रा. रा. शं. वाळिंबे यांचें 'पंडित कवि आणि त्यांचे आधुनिक टीका-कार' या विषयावर डॉ. के. ना. वाटवे यांच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान झालें. दि. २८।८।४८ व ४।९।४८ रोजीं प्रा. गं. बा. सरदार यांचीं 'वारकरी पंथ आणि महानुभाव पंथ' या

अनुक्रमणिका

विषयावर व्याख्यानें झालीं. दि. ११।१२।१३ सप्टेंबर १९४८ रोजीं डॉ. इरावती कर्वे यांची 'हिंदूंच्या समाजसंस्था' या विषयांवर व्याख्यानें झालीं.

**व्याख्यानसत्र**—कै. डॉ. माधवराव पटवर्धन स्मृतिदिनापासून परिषदेचें वार्षिक वाङ्‌मयसमालोचक व्याख्यानसत्र सुरू झालें. पुढील व्याख्यात्यांचीं नांवापुढें दिलेल्या विषयांवर व्याख्यानें झालीं.

प्रा. वि. बा. आंबेकर ( चरित्र ) श्री. ग. ह. खरे ( इतिहास ) श्री. गोपीनाथ तळवलकर ( लघुकथा ) प्रा. रा. शं. वाळिंबे ( टीका ) प्रा. गं. भा. निरंतर ( कादंबरी ) प्रा. म. वि. फाटक ( नाटक ). इतिहास या विषयावरील व्याख्यानप्रसंगीं श्री. य. रा. गुप्ते व नाटक–समालोचनप्रसंगीं श्री. मामासाहेब वरेरकर यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें.

**प्रकाशन समारंभ**—कै. ज्योतिर्विद शं. बा. दीक्षित यांच्या 'ज्योतिर्विलास अथवा रात्रीची दोन घटका मौज' या ग्रंथाच्या सुधारून वाढवलेल्या आवृत्तीचा प्रकाशनसमारंभ बुधवार दि. ५ मे १९४८ रोजीं परिषदेच्या वतीने महर्षि अण्णासाहेब कर्वे यांच्या अध्यक्षतेखालीं साजरा झाला. रविवार दि. २७।२।४९ रोजीं 'सुलभ विश्वकोश' ( भाग पहिला ) व 'परिभाषाकोश' या ग्रंथांचा प्रकाशन समारंभ परिषदेच्या व श्री. य. गो. जोशी यांच्या वतीने डॉ. मुकुंदराव उर्फ बाबासाहेब जयकर यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला.

**भेट व सत्कार**—चालू वर्षी पुढील थोर सद्‌गृहस्थांच्या भेटीचा योग परिषदेस आला. औंधचे राजे श्रीमंत भवानराव ऊर्फ बाळासाहेब पंतप्रतिनिधि, बिहार प्रांताधिपति लो. माधवरावजी अणे, रिझर्व्ह बँकेचे गव्हर्नर सर चिंतामणराव देशमुख, हिंदुस्थान सरकारचे वीज, खाणी व बांधकाम मंत्री ना. काकासाहेब गाडगीळ, हिंदी मध्यवर्ति विधिमंडळाचे अध्यक्ष ना. दादासाहेब मावळंकर, हिंदी साहित्य संमेलनाध्यक्ष श्री. शेठ गोविंददासजी. सर्वांचा परिषदेच्या वतीने सत्कार करण्यांत येऊन परिषदेच्या कार्याविषयी व योजनांविषयी त्यांना माहिती देण्यांत आली. परिषदेचे सभासद महर्षि डॉ. अण्णासाहेब कर्वे यांचा त्यांच्या ९१ व्या वाढदिवसानिमित्त व डॉ. र. पु. परांजपे यांचा त्यांच्या आस्ट्रेलियांतील यशस्वी कामगिरीबद्दल प्रा. न. र. फाटक यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार करण्यांत आला. विद्वद्रत्न डॉ. के. ल. दप्तरी यांचाहि परिषदेच्या व इतर दहाबारा संस्थांतर्फे सत्कार व गुणगौरव करण्यांत आला.

**शाखा सभा**—सातारा, अहमदनगर, सोलापूर, नाशिक, कोल्हापूर, सांगली व नागपूर या ठिकाणी परिषदेच्या शाखासभा असून त्यांचे कार्य समाधानकारकरीत्या चालू आहे. शाखासभांचे पदाधिकारी पुढीलप्रमाणें आहेत. **सातारा**—अध्यक्ष—श्री. कृ. के. कोलटकर, कार्यवाह श्री. ग. वा. गोडसे, **अहमदनगर**—अध्यक्ष श्री. त्र्यं. गं. धनेश्वर, कार्यवाह श्री. द. बा. डावरे, श्री. गो. दा. रानडे; **सोलापूर**—अध्यक्ष श्री. बा. न. जक्कल, कार्यवाह श्री. द. ब. मुद्गल, श्री. शा. ब. कुळकर्णी; **नाशिक**—अध्यक्ष—श्री. प्रि. भा. ल. पाटणकर, कार्यवाह डॉ. वि. भि. फडके, श्री. ल. वि. वेलदे; **करवीर साहित्य सभा**—अध्यक्ष प्रा. ना. सी. फडके. कार्यवाह श्री. व. द. जोशी. **दक्षिणी संस्थान साहित्य सभा**—अध्यक्ष श्री. धों. वा. गद्रे ( काव्यविहारी ), कार्यवाह श्री. क. श्री. काळे व कृ. गं. मराठे. **मध्यप्रांत शाखा सभा**—अध्यक्ष—डॉ. वि. भि. कोलते, कार्यवाह श्री. र. वि. कुलकर्णी, श्री. शं. वा. रानडे, श्री. रा. पु. सगदेव.

**दुखवटा सभा-ठराव**—' ज्ञानप्रकाश ' चे माजी संपादक व परिषदेचे माजी कार्याध्यक्ष कै. कृ. ग. उर्फ काकासाहेब लिमये, कै. गो. गो. मुजुमदार उर्फ कवि साधुदास, १९ व्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष नाट्याचार्य कै. कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर व सुप्रसिद्ध विनोदी नाटककार कै. माधवराव जोशी यांच्या निधनानिमित्त दुखवटासभा झाल्या. त्याचप्रमाणें परिषदेच्या कार्यकारी मंडळाने पुढील साहित्यिक व साहित्यप्रेमी यांच्या निधनानिमित्त दुखवटा ठराव संमत केले. कै. प्रा. श्री. ना. कोल्हटकर, कै. पां. गो. रानडे, कै. वत्सलाबाई घाटे, कै. प्रा. चिं. नि. जोशी, कै. के. ल. ओगले, कै. श्री. ना. कर्नाटकी, कै. प्रज्ञानेश्वर यति, कै. सर रघुनाथराव सबनीस, कै. दत्तो अप्पाजी तुळजापूरकर, कै. प्रमिलाबाई ओक, कै. के. बा. गजेंद्रगडकर, कै. डॉ. रा. का. शिरोडकर, कै. भा. व. भोपटकर, कै. के. अ. पाध्ये, कै. डॉ. वा. का. किर्लोस्कर, कै. शं. प. जोशी, कै. घाटगे (कोल्हापूर).

**अधिकारी मंडळाच्या सभा**—कार्यकारी मंडळाच्या ५, नियामक मंडळाच्या ४, व साधारण सभा ३ झाल्या. परिषदेने पुरस्कृत केलेल्या निरनिराळ्या योजनांबद्दल विशेष उहापोह करण्यांत आला. नित्यनैमित्तिक कामें करण्यांत आलीं.

**महाराष्ट्र साहित्य पत्रिकाः**—वृत्तांत अवधींत राजकवि श्री. य. दि. पेंढरकर यांच्या संपादकत्वाखाली पत्रिकेचे अंक निघाले. पत्रिकेला परतभेट म्हणून पुढील नियतकालिकें येत असतात.

**मासिकें:**—१ विशाल भारत-( हिंदी ), २ किर्लोस्कर, ३ स्त्री, ४ मनोहर, ५ सह्याद्रि, ६ यशवंत, ७ चित्रमय जगत्, ८ ध्रुव, ९ व्यायाम, १० पुरुषार्थ, ११ महाराष्ट्र, १२ वाङ्मयशोभा, १३ वऱ्हाड शालापत्रक, १४ अभिरुचि, १५ युगवाणी, १६ सत्यकथा १७ वनिताविश्व, १८ कुमार, १९ राष्ट्रवाणी ( हिंदी ),२० रोहिणी, २१ वसंत, २२ गोवर्धन, २३ पराग, २४ महात्मा, २५ प्रसाद, २६ नवभारत, २७ पूजा, २८ प्रेमबोध, २९ प्रकाश, ३० महाराष्ट्रविस्तार, ३१ गुरुदेव, ३२ हिंद, ३३ धर्मचक्र, ३४संजीवन, ३५ चित्ररेखा, ३६ P. E. N. ३७ आपली शेती, ३८ भारतमित्र, ३९ सुषमा.

**त्रैमासिकें:**—१ भारत इतिहास-संशोधक-मंडळ-त्रैमासिक, २ Bulletin of the Deccan College Post Graduate Research Institute, Poona. ३ नागरी प्रचारिणी पत्रिका. ४ तत्त्वज्ञानमंदिर. ५ श्री. फार्बस गुजराथ साहित्य सभा त्रैमासिक, ६ शोधपत्रिका.

**द्वैमासिक**—साहित्य.

**साप्ताहिकें:**—१ नवयुग, २ धनुर्धारी, ३ मौज, ४ भवितव्य ५ बालसन्मित्र, ६ समाधान, ७, युगांतर, ८ लोकयुग, ९ लोकराज्य, १० अर्थ, ११ महाराष्ट्र, १२ जनवाणी, १३ रविवार, १४ प्रकाश, १५ माऊली, १६ निजामविजय, १७ मालवण पत्रिका, १८ भारतीय प्रवासी, १९ Merdeka ( Indonesia )

**द्विसाप्ताहिकः**—केसरी.

**दैनिकें:**—१ ज्ञानप्रकाश, २ सकाळ, ३ काळ, ४ लोकशक्ति, ५ भारत, ६प्रभात मुंबई, ७ तरुण भारत.

परीक्षाः—१९४८ मधील परीक्षांना पुढीलप्रमाणें उमेदवार बसले व उत्तीर्ण झाले.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| आचार्य | ४ | पैकी | उत्तीर्ण | ० |
| विशारद | १३९ | ,, | ,, | ४९ |
| प्राज्ञ | ६९२ | ,, | ,, | ३५५ |
| प्रवेश | ६७० | ,, | ,, | ४३० |
| प्रथमा | ७८७ | ,, | ,, | ४०० |

## परीक्षा केंद्रें

| क्रमांक | केंद्राचें नांव | परीक्षेचें ठिकाण | केंद्राधिकाऱ्याचें नांव |
|---|---|---|---|
| १ | मुंबई | श्री सरस्वती गर्लस् स्कूल | कु. पिरोज आनंदकर |
| २ | परळ | आर. एम्. भट हायस्कूल | प्रि. मो. वा. दोंदे |
| ३ | विलेपारले | पार्ले टिळक विद्यालय | श्री. मा. सी. पेंढारकर |
| ४ | अंबरनाथ | म. गांधी विद्यालय | श्री. नी. अ. कोर्डे |
| ५ | कल्याण | सुभेदार वाडा | श्री. भ. गं. चोळकर |
| ६ | ठाणें | ज. एज्यु. इन्स्टि.चें हाय. | श्री. नी. त्र्यं. केळकर |
| ७ | डहाणू | हायस्कूल | श्री. वीरेंद्र अढिया |
| ८ | पुणें | नूतन मराठी विद्यालय | प्रा. ब. वें. बापट |
| ९ | पुणें | रास्ता पेठ, ए. सो. हायस्कूल | श्री. डी. पी. अत्रे |
| १० | जुन्नर | न्यू इंग्लिश स्कूल | श्री. वि. रा. नगरकर |
| ११ | सासवड | म. ए. सो. चें हायस्कूल | श्री. ह. आ. उंब्राणीकर |
| १२ | सातारा | न्यू इंग्लिश स्कूल | श्री. के. गो. नित्सुरे |
| १३ | अष्टे | हायस्कूल | श्री. ग. त्रिं. जोशी |
| १४ | इस्लामपूर | हायस्कूल | श्री. र. वि. कुलकर्णी |
| १५ | उंब्रज | म. गांधी विद्यालय | श्री. डी. श्री. बेडकिहाळ |
| १६ | कऱ्हाड | श्रीशिवाजी विद्यालय | श्री. वि. गं. सप्रे |
| १७ | किर्लोस्करवाडी | किर्लोस्कर हायस्कूल | श्री. के. रा. जोशी |
| १८ | तासगांव | हायस्कूल | श्री. नी. वि. परचुरे |
| १९ | विटें | म. गांधी विद्यामंदिर | श्री. गुं. दा. कंपली |
| २० | अहमदनगर | नगरपालिका सभागृह | श्री. शं. बा. आंब्रेकर |
| २१ | कोपरगांव | श्री. गो. विद्यालय | श्री. मा. वि. केतकर |
| २२ | पाथर्डी | श्री. ति. जैन इं. स्कूल | श्री. प. पु. मेहेंदळे |
| २३ | सोलापूर | ह. दे. हायस्कूल | श्री. कृ. ना. पिले |
| २४ | अक्कलकोट | शहाजी हायस्कूल | श्री. रा. ज. जकातदार |
| २५ | कुर्डुवाडी | लो. बो. मुलांची मराठी शाळा | श्री. चि. पां. कुलकर्णी |
| २६ | पंढरपूर | लोकमान्य विद्यालय | श्री. का. वि. सबनीस |
| २७ | बार्शी | मॉडेल हायस्कूल | श्री. रा. ग. नाडकर |
| २८ | बार्शी | सि. ज्यु. हायस्कूल | श्री. श. शि. चनशेटी |

| | | | |
|---|---|---|---|
| २९ | बार्शी | सुलाखे हायस्कूल | श्री. बा. ज. खेर |
| ३० | नाशिक | पेठे हायस्कूल | श्री. मो. वि. जोशी |
| ३१ | नांदगांव | वै. जि. हायस्कूल | श्री. गो. ना. देवळे |
| ३२ | निवाणा | मुलांची शाळा | श्री. दोधू तानाजी पाटील |
| ३३ | मालेगांव कँप | मराठी शाळा | श्री. फु. ना. पाटील |
| ३४ | येवला | म्यु. हायस्कूल | श्री. भि. त्र्यं. गुब्बी |
| ३५ | सटाणा | मराठा हायस्कूल | श्री. ना. आ. पगार |
| ३६ | जळगांव | न्यू. इं. स्कूल | श्री. मनुभाई देसाई |
| ३७ | अंमळनेर | प्रताप कॉलेज | प्रा. म. वि. फाटक |
| ३८ | असोदा | न्यू. इं. स्कूल | श्री. अ. बा. निंबाळकर |
| ३९ | किनगांव | मराठी शाळा | श्री. ब. मं. चौधरी |
| ४० | खिर्डी | इंग्रजी शाळा | श्री. हि. रू. चौधरी |
| ४१ | चाळीसगांव | प्रा. अ. विद्यालय | प्रा. ल. नी. छापेकर |
| ४२ | थोरगव्हाण | डी. ए. डी. हायस्कूल | श्री. भा. वा. काकडे |
| ४३ | धरणगांव | पी. आर. हायस्कूल | श्री. भा. रं. बोपर्डीकर |
| ४४ | पारोळें | हायस्कूल | श्री. मो. रा. कुलकर्णी. |
| ४५ | फैजपूर | म्यु. हायस्कूल | ,, आर. पी. चौधरी. |
| ४६ | बाम्हणोद | प्रा. शि. मं. ची दुय्यम शाळा. | ,, रा. रू. लोखंडे |
| ४७ | भडगांव | न्यू. इं. स्कूल | ,, वि. प्र. कुलकर्णी |
| ४८ | भुसावळ | द. शि. हायस्कूल | ,, श्री. व्यं. दा. काळवीट |
| ४९ | यावल | सिमकॉक्स हायस्कूल | ,, पं. खु. अट्रावलकर |
| ५० | रावेर | सरदार जी. जी.हायस्कूल | ,, द. व्यं. कुलकर्णी |
| ५१ | वरणगांव | म. गांधी विद्यालय | ,, म. श्री. भंडारी |
| ५२ | सावदा | आ. गं. हायस्कूल | ,, स. भि. बारके |
| ५३ | सांगवी बु॥ | प्रायमरी स्कूल | ,, ह. मो. वोरोले |
| ५४ | धुळें | आघाव प्रा. ट्रे. कॉलेज | ,, वा. कृ. शुक्ल |
| ५५ | तळोदे | हायस्कूल | ,, ना. रं. लिमये |
| ५६ | शहादें | न्यु. इं. स्कूल | ,, का. गं. गलगले |
| ५७ | अलिबाग | इंडस्ट्रीअल स्कूल | ,, प्र. कृ. केळकर |
| ५८ | पनवेल | ट्रे. कॉलेज | प्रा. नी. शं. नवरे |
| ५९ | पेण | प्रायव्हेट हायस्कूल | ,, म. द. दोंदे |
| ६० | महाड | हायस्कूल | ,, वि. त्रिं. चांदे |
| ६१ | दाभोली | श्री सरस्वती विद्यालय | ,, द्वा. वा. प्रभुखानोलकर |
| ६२ | मालवण | लक्ष्मीबाई टोपीवाला हा. स्कू. | मुख्याध्यापक |
| ६३ | रत्नागिरी | महिला विद्यालय | सौ. मालतीबाई जोशी |
| ६४ | वेंगुर्ले | श्री. मंगेश विद्यालय | श्री. नी. के. कोटणीस |
| ६५ | बेळगांव | वाङ्मय चर्चा मंडळ | श्री. बा. रं. सुंठणकर |
| ६६ | निपाणी | म्यु. हायस्कूल | ,, बा. रा. कुलकर्णी |

| | | | |
|---|---|---|---|
| ६७ | विजापूर | विजय कॉलेज | प्रा. श्री. र. भिडे |
| ६८ | कोल्हापूर | राजाराम हायस्कूल | ,, ए. व्ही. देशपांडे |
| ६९ | सांगली | सिटी हायस्कूल | ,, वि. गो. पाटील |
| ७० | अकोला | सीताबाई आर्टस् कॉलेज | प्रा. ग. द. जोशी |
| ७१ | अमरावती | श्रीरामकृष्णविद्यालय | ,, दा. अं. पंत |
| ७२ | पातुर्डा | आय्. ई. एम्. स्कूल | ,, एम्. एस्. निमदेव |
| ७३ | वाशीम | रा. आ. कॉलेज | ,, भ. बा. मोहरील |
| ७४ | नागपूर | सिटी कॉलेज | प्रा. पां. कृ. सावळापूरकर |
| ७५ | जबलपूर | महाराष्ट्र विद्यालय | ,, न. गो. ओक |
| ७६ | वर्धा | स्वावलंबी विद्यालय | ,, बलराम वनमाली |
| ७७ | औरंगाबाद | श्रीसरस्वतीभुवन हायस्कूल | ,, रा. चिं. पाटणकर |
| ७८ | अंबेजोगाई | श्री. यो. नू. विद्यालय | ,, दि. सि. देशपांडे |
| ७९ | शांतिसदन | अनंत विद्यालय | ,, गुरुनाथराव देशमुख |
| ८० | सेलू | नूतन विद्यालय | ,, बी. आर. गिलडा |
| ८१ | बडोदे | प्रतिभा हॉल | प्रा. ना. म. पटवर्धन |
| ८२ | इंदूर | म. सा. भुवन | ,, प्र. गो. घाटे |
| ८३ | उज्जयिनी | मिडल स्कूल | प्रा. बा. ना. मुंडी |
| ८४ | ग्वाल्हेर | पार्वतीबाई गोखले इंटर कॉलेज | ,, श्री. गो. कुंटे |
| ८५ | लातूर | मारवाडी राजस्थान विद्यालय | मुख्याध्यापक |

पुढील सद्गृहस्थांनी परीक्षक म्हणून काम केलें:—

प्रा. श्री. म. माटे, प्रा. श्री. रा. पारसनीस, प्रा. सौ. कुसुमावती देशपांडे, डॉ. वि. भि. कोलते, प्रा. कृ. पां. कुलकर्णी, श्री. गो. कृ. मोडक, डॉ. के. ना. वाटवे, प्रा. रा. श्री. जोग, प्रा. न. र. फाटक, प्रा. गं. वा. सरदार, प्रा. म. वि. फाटक, डॉ. न. का. घारपुरे, प्रा. म. ना. अदवंत, श्री. वा. रा. ढवळे, प्रा. वि. बा. अंबेकर, प्रा. शं. के. कानेटकर, प्रा. शं. गो. तुळपुळे, डॉ. ग. वा. तगारे, प्रा. श्री. के. क्षीरसागर, प्रा. रा. शं. वाळिंबे, प्रा. दु. का. संत, प्रा. वा. दा. गोखले, प्रा. गं. भा. निरंतर, श्री. प्रं. न. जोशी, श्री. शं. बा. आंबेकर, श्री. तु. ता. सावंत, श्री ह. श्री. शेणोलीकर, प्रा. सौ. सरोज शेंडे, श्री. वा. श्री. पुरोहित, प्रा. अ. ना. देशपांडे, श्री. क. श्री. काळे, प्रा. शं. गो. वाळिंबे, प्रा. रा. ना. झोळ, श्री. म. दा. साठे, श्री. मो. रा. वाळंबे, श्री. गो. म. कुलकर्णी, प्रा. द. ल. मांजरेकर, श्री. वा. ज्यो. देशपांडे, श्री. बा. वा. देवधर, श्री. ह. स. गोखले, श्री. व. वा. मणेरीकर, कु. सरोजिनी बाबर, श्री. द. के. बर्वे, श्री. लीलाबाई साठे, प्रा. चंद्रकुमार डांगे, श्री. रा. पु. सगदेव, श्री. वि. श्रा. चौधरी.

परिषदेच्या कार्यात अनेकांचें अनेक तऱ्हेने साहाय्य होत आहे, त्याबद्दल परिषद् सर्वांची ऋणी आहे.

गं. भा. निरंतर
वा. दा. गोखले
चिटणीस









# महाराष्ट्र साहित्य परिषद्

१ एप्रिल १९४८ ते ३१ मार्च १९४९ पर्यंतचा

## जमाखर्च

| खातें | जमा | खातें | नांवें |
|---|---|---|---|
| ट्रस्टींकडील व्याज | ६००-०-० | पगार खातें | २५१३-१४-० |
| सा. स. वर्गणी | २२९३-८-० | वीज | ८६-३-६ |
| पत्रिका वर्गणी | १५६-८-० | भुईभाडें | १५-०-० |
| संलग्न संस्था वर्गणी | ६३-०-० | म्यु. कर | ३७-१०-० |
| ग्रंथविक्री | १०३७-२-९ | कार्यालय छपाई | ३००-२-० |
| परीक्षा शुल्क | ९१५३-१४-० | कार्यालय टपाल | १७२-१२-३ |
| मा. प. सा. देणगी | ५२२-०-० | सादील | ९८-१०-३ |
| जाहिरात खातें | ५६-८-० | आतिथ्य | १७९-५-३ |
| व्याज व इतर | १२३-२-० | उपसमिति | ३५-१-० |
| संमेलन देणगी | २८०-०-० | किरकोळ | २४७-२-६ |
| एकूण | १४२८५-१०-९ | कार्यकारी नियामक सभा | १७८-१५-३ |
| | | पत्रिका | ३१०४-११-३ |
| | | इमारत दुरुस्ती | २४-१-० |
| | | प्रचार | ३३९-१५-० |
| | | नवीन सामान | ... ... |
| | | निवडणूक | ७४२-१२-० |
| | | परीक्षा खातें | ४११८-९-० |
| | | शाखा सभा | २११-०-० |
| | | प्रवास | ३३३-०-० |
| | | प्रकाशन | १०४५-८-० |
| | | घसारा | ५००-०-० |
| | | | १४२८४-४-३ |
| | | शिल्लक | १-६-६ |
| | | एकूण | १४२८५-१०-९ |

तपासलें. बरोबर आहे.

(सही) जी. एम्. ओक आणि कंपनी,
रजिस्टर्ड अकौंटंट्स्.
(ऑनररी ऑडिटर्स.)





# महाराष्ट्र साहित्य

१९४८–४९

## निधि व येणें

| | | |
|---|---|---|
| सामान्य निधिः— | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें | १२४६६–३–६ | |
| अधिक निव्वळ जमा चालू सालचे | १–५–६ | १२४६७–९–० |
| इमारत निधिः— | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें | २३९३८–२–० | २३९३८–२–० |
| ग्रंथ संग्रहालय निधिः— | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें | १९१२–२–६ | |
| अधिक चालू सालांतील जमा | ५६४९–०–० | ७५६१–२–६ |
| इतिहास योजना निधिः— | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें | १९६६–०–० | |
| अधिक चालू सालांतील जमा | ३२–८–० | १९९८–८–० |
| चिपळूणकर स्मारक निधिः— | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें | १०९५४–१२–० | |
| अधिक चालू सालांतील जमा | ३२२०–५–० | १४१७५–१–० |
| अनामत खातेंः— | | |
| अखेरची शिल्लक | १८४१–१४–० | १८४१–१४–० |
| प्राव्हिडंट फंड खातेः— | | |
| अखेरची शिल्लकः— | ३०३–४–० | ३०३–४–० |
| एकूण | | ६२२८५–८–६ |

आम्ही "महाराष्ट्र साहित्य परिषद्" पुणें या संस्थेचा १५ मार्च १९४९ अखेरचा ताळेबंद व १ एप्रिल १९४८ ते १३ मार्च १९४९ या मुदतीचें आवक जावक पत्रक तपासलें. परिषदेच्या हिशेबाच्या पुस्तकावरून व आम्हांस मिळालेल्या माहिती व खुलाशावरून सदरहू ताळेबंद परिषदेची खरोखर वस्तुस्थिति दर्शवीत आहे. सदरहू ताळेबंदामध्ये परिषदेच्या ट्रस्टची जिंदगी व त्याचे हिशेब यांचा समावेश नाही.

जी. एम्. ओक आणि कंपनी.
रजिस्टर्ड अकौंटंट्स्,
ऑनररी ऑडिटर्स.

दि. २१–३–१९४९.

## परिषद्, पुणें

### (मार्चअखेर) ताळेबंद

| जिंदगी व येणें | | |
|---|---|---|
| इमारतः— | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें | २९२०२-५-६ | २९२०२-५-६ |
| कार्यालय सामान व मा. प. सा. मंदीरः— | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें | १४५८-८-९ | |
| अधिक चालू सालांतील | ६८८-०-० | २१४६-८-९ |
| ग्रंथ संग्रहालय व ग्रंथ खरेदी खातेंः— | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें | ३२४७-८-० | |
| अधिक चालू सालांतील | ३६२-७-६ | ३६०९-१५-६ |
| ट्रस्टी खातेंः— | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें | १४८८-६-९ | १४८८-६-९ |
| डेक्कन एज्युकेशन सोसायटीः— | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणें | १२०००-०-० | |
| अधिक चालू सालांतील .. | ६०००-०-० | १८०००-०-० |
| ॲडव्हान्सः— | | |
| चालू सालांतील | ५८२-६-० | ५८२-६-० |
| प्रॉव्हिडन्ट फंड खातेंः— | ३०३-४-० | ३०३-४-० |
| शिलक | | |
| रोख | ५१-०-९ | |
| बँकेंत | ६९०१-९-३ | ६९५२-१०-० |
| एकूण | | ६२२८५-८-६ |

अनुक्रमणिका

# वार्षिक साधारण सभा

परिषदेची वार्षिक साधारण सभा मे महिन्यात पुणें येथे होणाऱ्या संमेलनाच्या अवधींत भरणार आहे. सभेची निश्चित वेळ, दिवस व स्थळ वृत्तपत्रांतून एक आठवडा जाहीर होईल. सर्वांनी सभेला यावें ही विनंती.

## कामें

( १ ) दुखवटा
( २ ) मागील सभांचें इतिवृत्त
( ३ ) १९४८-४९ चें म. सा. प. च्या नियामक मंडळाने सादर केलेलें इतिवृत्त ( पात्रिका अंक ८९ मधे आहे )
( ४ ) १९४८-४९ चा नि. मं. ने सादर केलेला जमाखर्च ( पात्रिका अंक ८९ )
( ५ ) १९४९-५० चे नि. मं. ने सादर केलेलें अंदाजपत्रक ( पात्रिका अंक ८९ )
( ६ ) हिशेबतपासणीसांची नेमणूक
( ७ ) पुढील संमेलनाच्या निमंत्रणांचा विचार
( ८ ) इतर ठराव
( ९ ) अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळीं येणारीं कामें

दि. २।४।१९४९. पुणें.

श्री. म. माटे ( कार्याध्यक्ष )

न. र. फाटक ( अध्यक्ष )

# परिषदेच्या सभासदांस विनंती

महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें ३२ वें अधिवेशन पुणें येथे १४, १५ व १६ मे १९४९ या कालावधींत पुणें नगर वाचन मंदिरातर्फे भरणार आहे. संयुक्त महाराष्ट्र, पुणें विद्यापीठ इत्यादि महत्त्वाचे विषय संमेलनापुढें प्रामुख्याने असून त्या बाबतींत महत्त्वाचे निर्णय करावयाचे आहेत. २०।२२ वर्षांनंतर परिषदेच्या कचेरीच्या गावीं संमेलन भरत असल्यामुळे आग्रहाची विनंती की परिषदेच्या सभासदांनी बहुसंख्येनें प्रतिनिधि होऊन संमेलनाचें कार्य यशस्वी करावें. प्रतिनिधीत्वाचें शुल्क रु. ३ आहे. संमेलनाच्या अध्यक्षस्थानीं आचार्य शं. द. जावडेकर व स्वागताध्यक्षपदीं महामहोपाध्याय प्रा. द. वा. पोतदार यांची निवड झाली आहे.

चिटणीस
म. सा. परिषद्

अनुक्रमणिका






